


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत मराठी अभ्यास परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या भाषा आणि जीवन ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून मराठी अभ्यास परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व मराठी अभ्यास परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका



तें झालेलें वर्तमान मडमीने आपल्या खोलींतून पाहिलें, आणि चाकराकडून त्या म्हातारीला खाया ला व पांघरायाला पाठवून दिल्हें. मग जेव्हां शेरिबाईची मडमीशीं गांठ पडली, तेव्हां दोघींचीं संभाषणें याप्रकारें झालीं; मडमीने तिला विचारिलें, अगे तूं जेवीत असतां कोण तुझ्याजवळ आली होती बरें?

शेरिबाई.—ती भीकमार्गी एक म्हातारी भाली होती.

मडम.—तिला तूं काय दिल्हेंस?

शे.—मी तिला काय देऊं? मीहि गरीब दुबळीच आहें.


मराठी अभ्यास परिषद पत्रिका

# भाषा आणि जीवन

वर्ष १८ : अंक ३ पावसाळा २०००










अनुक्रमणिका

## अनुक्रम



---


- प्रकाशन : त्रैमासिक (जानेवारी, एप्रिल, जुलै, ऑक्टोबर)
- संपादन - समिती : विजया देव (प्रमुख), अशोक रा. केळकर, अंजली सोमण, द. दि. पुंडे, प्र. ना. परांजपे, मॅक्सीन बर्न्सन, आशा मुंडले, मृणालिनी शहा, गं. ना. जोगळेकर, नीलिमा गुंडी
- संपादकीय संपर्क व परीक्षणार्थ पुस्तक : विजया देव ९ प्रिया, ९ वरळी सीफेस मुंबई ४०० ०२५. दूरध्वनी (०२२) ४९७ १७००
- व्यवस्थापकीय संपर्क व पैशांचा भरणा : मृणालिनी शहा, १ शीतल अपार्टमेंटस्, ४६/४ एरंडवणे, पुणे ४११००४. दूरध्वनी : ५४३ ३८६९
- पत्रिकेची वर्गणी, परिषदेची वर्गणी, जाहिरातीचे दर : आवरणपृष्ठ तीन पहा.
- सूचना : पत्रिकेत प्रसिद्ध होणाऱ्या लेखांच्या/ लेखकांच्या मतांशी संपादक किंवा परिषद सहमत असतीलच, असे नाही.
- या अंकाच्या प्रकाशनासाठी महाराष्ट्र राज्य साहित्य संस्कृति मंडळाचे अंशतः अनुदान मिळालेले आहे. तथापि या नियतकालिकातील लेखकांच्या विचारांशी मंडळ व राज्यशासन सहमत असेलच असे नाही.
- संपादक : विजया देव, प्रकाशक व मुद्रक : मराठी अभ्यास परिषदेसाठी मृणालिनी शहा
- मुद्रण स्थळ : सिध्दी एन्टरप्रायजेस, 'मोहोर', आसावरी सोसायटी, पुणे ४११०२९.

संपादकीय

# चिंता करितो भाषेची

उद्याच्या जगात मराठी टिकेल का, वाढेल का, आणि टिकली तर तिचं स्वरूप आणि स्थान काय असेल, याची काळजी मराठी प्रेमींना पडलेली दिसते. त्यामागची कारणं अनेक आहेत. इंग्रजीचा अवाजवी सोस आणि वाढता प्रभाव, सर्वसामान्यांपासून उच्चशिक्षित-उच्चपदस्थांपर्यंत पुष्कळांची भाषेबद्दलची उदासीनता, तंत्रज्ञानाच्या प्रगतीमुळे संज्ञापनाला आलेला वेग इत्यादी अनेक गोष्टींमुळे मराठीचं भवितव्य धोक्यात आलंय असं साहजिकच मराठी प्रेमींना वाटतं. फक्त मराठी प्रेमींनाच नव्हे तर, जगात ज्या ज्या प्रचलित भाषा आहेत त्यांच्या त्यांच्या भाषकांचीही आपापल्या भाषेबद्दल हीच भावना आहे. त्याची कारणं वेगवेगळी आहेत एवढंच. त्यांतलं एक कारण संज्ञापनाचा अफाट वेग हे आहे.

संगणक आणि महाजालातील प्रगतीमुळे कालपरवापर्यंत अशक्य वाटलेल्या, कल्पनेतही नसलेल्या गोष्टी सहज शक्य होत आहेत. मनुष्यप्राण्याला भाषिक प्रौढावस्था येते त्या वयातच संगणकसंलग्न सर्व आयुधं लीलया हाताळणारी मुलंमुली जगभर घराघरांतून दिसतात. दूरध्वनी, फॅक्स, इ-मेल, इंटरनेट यांच्या द्वारा सर्व प्रकारचं संज्ञापन- माहिती / ज्ञानाची देवाणघेवाण, संगीत ऐकणं, चित्रपटाचा आस्वाद घेणं, इत्यादी- क्षणार्धात सहज शक्य झालं आहे आणि त्यामुळे गरीब-श्रीमंत या शब्दांचा आशय बदलून गेला आहे. संगणक वापराचं कौशल्य ज्याच्याकडे आहे तो श्रीमंत व जो त्यापासून वंचित राहिला आहे तो गरीब, हा नवा अर्थ आहे. कारण ज्ञानार्जन, माहितीर्जनाचं संगणक हे प्रमुख साधन झालेलं आहे. थोडक्यात, एक जुनं संस्कृत सुभाषित, त्यातल्या एका शब्दाचा फेरफार करून नव्या काळाचं सुभाषित बनलंय.

पृथिव्यां त्रीणि रत्नानि जलमन्नं संगणकम् ।
मूढैः पाषाणखंडेषु रत्नसंज्ञा विधीयते ।।

(पाणी, अन्न आणि संगणक हीच खरी या पृथ्वीवरची रत्नं. काही मूढ बापडे पाषाणखंडांना रत्न म्हणतात झालं.) ('संगणक' ऐवजी मूळ संस्कृत सुभाषितात 'सुभाषितम्' असा शब्द आहे.)

देश, वंश, वर्ण, निज भाषा यांची बंधनं गळून पडून आजचे सर्व 'मूषक'स्वार

एका वेगळ्या जगाचे नागरिक झाले आहेत. त्यांना 'सिटिझन'च्या धर्तीवर आता 'नेटिझन' म्हटलं जातं.

तर आता आपल्या मूळ मुद्द्याकडे, म्हणजे भाषाप्रेमींना वाटणाऱ्या चिंतेकडे वळू. अंगुलीस्पर्शानं निमिषार्धात जगाची भ्रमंती करणाऱ्या, जगाच्या कानाकोपऱ्यात विखुरलेल्या नेटबांधवांशी सहज संपर्क साधणाऱ्या या 'नेटिझन' ची भाषा किती बिघडत चाललीय ही ती काळजी. झटपट आणि विनासायास संदेश पाठवणारे हे मूषकस्वार भाषेची हवीतशी मोडतोड करतात. व्याकरण, स्पेलिंग, वाक्यरचना यांना धुडकावून लावतात. थोडक्यात भाषिक रीतिरिवाजांची ते तमा बाळगत नाहीत. म्हणून त्यांना 'नेटिकेट' ('एटिकेट'च्या धर्तीवर बनवलेला नवा शब्द) शिकवायला हवे आहेत, असा सूर आढळतो. त्यांचा मुख्य रोख महाजालातील भाषेत वापरण्यात येणाऱ्या संक्षिप्त रूपांवर, स्पेलिंगच्या मोडतोडीवर आहे आणि प्रामुख्याने इंग्रजी भाषाच या मोडतोडीचं लक्ष्य आहे. इंटरनेट, इमेल वापरणाऱ्या आपल्याला ही लघुरूपं परिचित आहेत. कधीकधी, कोणत्या शब्दांसाठी, वाक्प्रयोगांसाठी, वाक्यांशांसाठी कोणती लघुरूपं सर्रास वापरली जातात याच्या याद्याही वृत्तपत्रात, नियतकालिकात येतात. आपलं म्हणणं अक्षरशः चुटकीसरशी जगाच्या दुसऱ्या टोकाला पोचवता यायला लागल्यामुळे, जिथे कमी अक्षरं/शब्द वापरून काम भागतं तिथे त्यापेक्षा अधिक भाषावयव कशाला, असा विचार करून ही काटछाट सुरू झाली. त्यामुळे हा 'नेटिकेट' चा प्रश्न उद्भवला.

वास्तविक, संदेशाच्या देवाणघेवाणीचा वेग वाढला की ठराविक वाक्यांशांची, शब्दांची संक्षिप्त रूपं करायची, हा पूर्वीपासूनचा पायंडा दिसतो. भेंडोळी केलेल्या, लांबलचक उलगडत जाणाऱ्या खलित्यात शोभणारा 'सकल सौभाग्य... वज्रचुडेमंडित' किंवा 'क्षत्रिय कुलावसंत....' असा मायना पोस्टकार्डावर कोण लिहीत बसणार ? संज्ञापन माध्यमाला गती मिळाली, ते थोडं अधिक सुकर झालं की रिवाज म्हणून, संकेत म्हणून लिहायचा मजकूर संक्षिप्त होत जातो. मो. न. ल. आ. क. लो. अ. (मोठ्यांस नमस्कार, लहानांस आशीर्वाद, कळावे, लोभ असावा) हे लिहिणारे आपणच ना ? मग btw (by the way) बद्दल तक्रार कशाला ? देवनागरीची मोडी लिपी, इंग्रजीतील धावती लिपी हे देखील संज्ञापन वेगासाठी झालेले बदल ना?

या सर्व घटनांकडे आशावादी दृष्टीने बघणारे जे आहेत ते म्हणतात - जोपर्यंत एका माणसाला दुसऱ्या माणसाशी उत्कटतेनं संवाद साधावासा वाटतो तोपर्यंत काळजी कशाला? ''यंत्रच माझ्या सगळ्या गरजा पुरवील, इतर माणसं गेली खड्ड्यात'' असं



अनुक्रमणिका

म्हणून माणूस यंत्रालाच धरून राहायला लागला तर ?

भाषेच्या बदलाला चालना देणारे घटक सतत कार्यरत असतात. कधी ते नैसर्गिक असतात, कधी राज्यविस्तार, आक्रमणं इत्यादी रूपांत येतात. कधी हे बदल वर्षानुवर्षं लक्षात येणार नाहीत इतक्या संथ गतीनं होतात तर कधी झपाट्यानं. पण बदल होत असतात हे निश्चित. आजवर मानवेतिहासाला ज्ञात असणाऱ्या कारणांपेक्षा एका वेगळ्याच कारणामुळे, आणि विलक्षण वेगामुळे घडून येणारे हे स्थित्यंतर. हे वैज्ञानिक-तांत्रिक कारणांमुळे घडून येणारे स्थित्यंतर आहे. पृथ्वीवरच्या दोन माणसांना ते आकाशमार्गाने निमिषार्धात जोडते. कोणी सांगावे, उद्या मध्यस्थ मूषकाचीही गरज भासणार नाही अन् स्थूल भाषेचीही. आजवर अज्ञात असलेले मानवी मेंदूचे दालन उद्या प्रकाशात आले तर कदाचित 'शब्देविण संवाद' ही होऊ शकेल ''आणि अचानक शिवली जातील ध्रुवाध्रुवातील काही कडवी.''

अशा वेळी भाषेची फिकीर करत बसण्याचे प्रयोजनच उरणार नाही.

□□□

**विजया देव**

**९ प्रिया, ९ वरळी सीफेस, मुंबई ४०० ०२५.**

**दूरध्वनी (०२२) ४९७ १७००**

---

*चुकीची दुरुस्ती*

भाषा जीवन १८:२, उन्हाळा २००० या अंकात आम्ही सुमन बेलवलकर यांच्या 'बेलभाषा' या लेखसंग्रहाचे प्रा. ग.प्र. प्रधान यांनी केलेले परीक्षण छापले आहे. या परीक्षण लेखाच्या शीर्षकात (पृ. ५६) बोलभाषा असे छापले गेले आहे. या चुकीबद्दल आम्ही लेखक, परीक्षणकार आणि वाचक यांची क्षमा मागतो.

***संपादक***





अनुक्रमणिका

# ऐसा अस्तु गेला माझारिचि । आयुष्यभाक

मृणालिनी कामत

संस्कृत साहित्य, संस्कृत व्याकरण, इंग्रजी वाङ्मय आणि समीक्षा, भाषाविज्ञान, संख्याशास्त्र आणि गणित अशा अनेक विषयांचे गाढे अभ्यासक डॉ. दिनेश दत्तात्रेय माहुलकर यांचे २८ एप्रिल रोजी बडोद्यातील त्यांच्या निवासस्थानी निधन झाले. निधनाअगोदरच्या चार-पाच महिन्यांपूर्वी त्यांना झालेल्या अपघातातून ते वयोमानानुसार संथगतीने का होईना पण सुधारत होते. बुद्धीचा तल्लखपणा पूर्वीसारखाच होता. संथपणाने बोलणं आणि समोरच्यांचे विचार कुतूहलानं ऐकणं कायम होतं. हालचालीतला मंदपणा हीच काय ती वार्धक्याची आणि पिकलेपणाची खूण होती, त्यामुळे त्यांचं निधन अकाली नसलं तरी अनपेक्षित होतं. त्यांच्या जाण्यामुळे आता मागे राहिली आहे ती त्यांची अनेक विषयांवरील ग्रंथसंपदा आणि साथीला आहेत त्यांच्या बकुळफुलासारख्या सुगंधी आठवणी.

शेवटच्या श्वासापर्यंत ज्ञानाचा अखंड ध्यास घेतलेलं असं हे व्यक्तिमत्त्व होतं. बडोद्याच्या महाराजा सयाजीराव विद्यापीठातील भाषाविज्ञान विभागाच्या प्रमुख पदावरून निवृत्त झाल्यानंतरही त्यांची ज्ञानसाधना थांबली नव्हती. सिमला येथील 'इंडियन इन्स्टिट्यूट ऑफ ॲडव्हान्स स्टडीज' या संस्थेचे ते 'फेलो' होते. बडोद्याचा उन्हाळा सुरू झाला की ते सिमल्याला जात आणि त्यांच्याच शब्दांत सांगायचे तर, ''हिवाळ्यात सिमल्याच्या नळांचे पाणी गोठले की बडोद्याला येत.'' सहा-सात महिने सिमल्याला भाषाविज्ञान या विषयावर त्यांचे संशोधन चालू असे. बडोद्याला आल्यानंतर बडोदेकरांना त्यांच्या घराची दारे सदैव खुली असत. संशोधनाच्या, अभ्यासाच्या आणि ग्रंथांच्या सहवासात वावरणारी माणसे बऱ्याचदा एकलकोंडी असतात, पण माहुलकर सरांच्या बाबतीत ही स्थिती संपूर्णपणे वेगळी होती. 'अलौकिक' अशा एकाच विशेषणाने सिद्ध होणारी बुद्धिमत्ता त्यांना लाभली होती. अफाट स्मरणशक्ती असूनही सर्वांना आपलासा करणारा स्नेहभाव त्यांच्यापाशी होता.

सरांचा आणि माझा परिचय अलीकडच्या ७-८ वर्षांमधला. 'सहवास' म्हणण्याइतका नसला तरी ज्या भेटी झाल्या त्यामधून दरवेळी काही नव्या सूचना (insights) त्यांच्या बोलण्यातून मिळत गेल्या. यामुळेच ते बडोद्यात आले की त्यांना भेटणाऱ्यांची गर्दी त्यांच्या घरी असे. सर आणि अलकनंदाबाई या सर्वांचे स्वागत करीत

असत. कोणत्याही बडेजावाशिवाय असणारी त्यांची अफाट विद्वत्ता आणि त्यांच्या स्वभावातील अकृत्रिम निर्मळपणा हा त्यांचा सर्वांना वेधून घेणारा गुण होता. त्यांच्या ज्ञानाने त्यांच्याभोवती कुंपणे उभारली नाहीत की इतरांना दूर ठेवणारी दहशत निर्माण केली नाही. खरे तर त्यांच्या ज्ञानाची क्षेत्रे अपरिमित होती. गणित, भाषाविज्ञान, व्याकरण, इंग्रजी साहित्य, संगणकीय शास्त्र अशा अनेक ज्ञानक्षेत्रांमध्ये त्यांचा सहज वावर होता. त्यांच्या विस्तारलेल्या अभ्यासक्षितिजाची यावरून कल्पना येऊ शकते. अशा ज्ञानव्रती माणसाचे वाचन अविरत आणि चौफेर होते ही निराळेपणाने सागंण्याची गोष्ट नाही. पण असे असूनही आमच्यासारख्या वाङ्मयाच्या नवागत, साध्या अभ्यासकांना त्यांच्याकडे कितीही साधेसुधे प्रश्न घेऊन जाऊन त्यावर चर्चा करण्याची कधी भीती वाटली नाही. अर्थात 'राखावी बहुतांची अंतरे' हा त्यांचा हेतू नव्हता. उलट आपली मते ते फार स्पष्टपणे मांडीत असत.

सरांच्या वक्तृत्वातील त्यांच्या विचारांचा ठाशीवपणा आणि सलगता ऐकायला मिळाली ती १९९६ च्या डिसेंबरमध्ये. त्यांच्या वयाला पंचाहत्तर वर्षे पूर्ण झाल्याचे निमित्त होते. पण त्यांचा कोणत्याही सत्कार समारंभावर आणि त्यातील गौरवपर भाषणांतील शब्दजालावर विश्वास नव्हता. त्यामुळे बडोद्यातील 'मराठी अकादमी'ने दोन दिवसांचे चर्चासत्र आयोजित केले होते. दुसऱ्या दिवशी त्यांनी समारोपाचे जे भाषण केले, त्याचा मनावर झालेला परिणाम आजही आठवतो. जवळजवळ ६०-६५ वर्षांचा कालपट त्यांच्या बोलण्यातून उलगडत होता. सयाजी महाराजांसारख्या प्रजेच्या सुखदु:खांशी जोडल्या गेलेल्या राजाच्या कारकीर्दीनंतरच्या स्वातंत्र्याच्या काळात बडोद्यात झालेले सामाजिक, राजकीय बदल, मराठी-गुजराती भाषकांच्यामधील सामंजस्याच्या वातावरणात वाढलेल्या मराठी समाजाला नंतर सामोरे जावे लागलेल्या प्रश्नांचे स्वरूप, भाषावार प्रांतरचनेनंतर तटतटलेल्या भाषिक जाणिवांचे डंख याबाद्दलचे अनुभव माहुलकर सरांच्या भाषणातून सहजपणाने पाझरत होते. पण त्यामध्ये कोणताच कडवटपणा नव्हता किंवा जुन्या माणसांमध्ये नव्याचा अधिक्षेप करण्याची जी अव्हेरवृत्ती असते तिचाही लवलेश नव्हता. याचे कारण म्हणजे या अनुभवांना तोलून धरणारी सरांची चिकित्सक आणि चिंतनमग्न समंजसता आणि सर्व अनुभवांचे स्वागत करणारी त्यांची वृत्ती. त्यामुळेच त्यांच्या समकालीनांबरोबरच अनेक नवोदितांशीही त्यांचा संवाद चालत असावा.

काटेकोरपणा हा त्यांच्या स्वभावामधील शिस्तीचा एक भाग होता. त्यांच्या

अध्यक्षतेखाली भरलेल्या चर्चासत्रांमध्ये त्यांचे भाषण ऐकताना ही शिस्त लक्षात येई. त्यांची टिपणे, वक्त्यांच्या भाषणांनंतर त्यांनी केलेल्या सूचना यामध्ये कधी ढिलेपणा आढळला नाही. प्रखर मतभेदांनंतर खोलीच्या बाहेर आलेल्या माहुलकर सरांचे बोलणे दवासारखे टवटवीत असायचे, मतभेदाचा मागमूसही नंतर दिसत नसे. एका सुसंस्कृत, संयमी व्यक्तिमत्त्वाची आभा फक्त जाणवायची.

भाषाविज्ञान, इंग्लिश वाङ्मय इ. विषयांवरील त्यांची ग्रंथसंपदा मोठी आहे. माहुलकर सरांच्या या कार्याचा गौरवही त्या त्या क्षेत्रात झालेला आहे. त्यांचे मराठी भाषेतील लेखन मात्र तसे अज्ञात राहिलेले आहे; याचे कारण म्हणजे ते संग्रहित झालेले नाही. पण मराठी साहित्यातील एका क्रांतिकारक पर्वाचे ते साक्षीदार होते, एवढेच नव्हे तर या क्रांतिपर्वामध्ये त्यांचाही भाग होता. बडोद्याहून १९४३ साली निघालेले 'अभिरुची' हे मासिक म्हणजे पु. आ. चित्रे व विमल चित्रे या संपादकद्वयीने चालवलेली मराठी साहित्यातील अभिनव चळवळ होती. वाङ्मयविषयक नव्या जाणिवा रुजवू पाहणारी आणि वाङ्मयप्रकारांविषयीच्या संकल्पनांमध्ये बदल घडवू पाहणारी अशी ही चळवळ होती. मुंबई, पुण्याबरोबर इंदूर, नागपूर, कोल्हापूर अशा गावोगावांतील मराठी लेखकांनी 'अभिरुची' ला भरीवपणा दिला होता. चित्रे आणि माहुलकर सर एकाच वयोगटातील. त्यांचा सहवासही जुना होता, माहुलकरांचे व्यक्तिमत्त्व इतके संपन्न होते, आणि त्यांच्या अभ्यासाचे क्षेत्र इतके विस्तृत होते की त्याचा लाभ मराठी वाचकांना मिळावा म्हणून अनेक विषयांवर, तसेच इंग्रजीतील नवनव्या वाङ्मयीन प्रवाहांवर त्यांनी 'अभिरुची'तून लिहावे असा चित्रे यांचा प्रयत्न असे. त्या दृष्टीने त्यांनी 'अस्तित्ववाद', 'पाश्चात्त्य कलावाद', 'नवे मन' हे महत्त्वाचे लेख लिहिले होते. 'अभिरुची' च्या पहिल्या पर्वामध्ये हे लेखन प्रसिद्ध झाले आहे.

'अस्तित्ववाद' हा जुलै ४८ मध्ये प्रसिद्ध झालेला लेख अतिशय महत्त्वाचा लेख आहे. यामध्ये कीर्कगार्ड, आंद्रेझीद, सार्त्र या तीन अस्तित्ववादी लेखकांच्या भूमिकांचे सूत्र त्यांनी मांडलेले होते. ते म्हणतात, ''वासना आणि बुद्धी, बुद्धी आणि श्रद्धा यांचे प्रचंड आवर्त मानवी 'स्व' मध्ये जेव्हा निर्माण होतात तेव्हा जीवनाचे सुकाणू कोणत्या दिशेकडे वळवावे हा मानवी जीवनातील एक अगम्य प्रश्न होऊन बसला आहे. ज्यांना आपण प्रतिभाशाली म्हणतो, त्यांच्या 'स्व' चे हे एक लक्षण आहे. असा संघर्ष प्रतिभावंतांमध्ये जाणवतो आणि हे द्वंद्व त्यांच्या हृदयात चालते. तेच त्यांच्या साहित्याची





अनुक्रमणिका

निर्मिती करते, असे सूत्र माहुलकरांनी सांगितले आहे.

आंद्रेझीद हा लेखक या अंतर्मनातील युद्धापासून सुटका मिळावी म्हणून लेखन करीत होता. तर कीर्कगार्डच्या मनातील परमेश्वरावरील श्रद्धा आणि बुद्धी यांच्यातील द्वंद्वामुळे तो लेखनाकडे वळला. त्याची परमेश्वरावर श्रद्धा ठेवणयाची इच्छा त्याच्याच बुद्धीने अडवल्याने पूर्ण झाली नाही. तो तत्त्वज्ञानाकडे वळला खरा पण जीवनाचा स्पर्श शोधण्यासाठी त्याने नंतर कलेचा आश्रय घेतला. सार्त्रच्या मते परमेश्वर मरून गेला होता. पण ही त्याची भूमिका नास्तिकता शिकवीत नाही. माणसाला आपल्या अपयशाची जबाबदारी ईश्वरावर टाकता येणार नाही, हीच ईश्वरी भक्तीची परमोच्चता आहे हे सार्त्रला सांगायचे होते, असे मत माहुलकर सरांनी येथे मांडले आहे.

दुर्दैवाने या विषयावर पुरेशी चर्चा झाली नाही. वास्तविक मराठी समीक्षेला त्याकाळी आदर्श समीक्षेचा वस्तुपाठ देणारी अशी ही विचारधारा होती. पण प्रभाकर माचवे यांचा अपवाद वगळता चर्चेचे आव्हान कोणी स्वीकारले नाही.

एप्रिल मे ५० च्या 'अभिरुची' च्या अंकामधील 'नवे मन' हा लेख एका वेगळ्या विषयावरील आहे. कोपर्निकस आणि डार्विन या दोन शास्त्रज्ज्ञांच्या सिद्धांतांमुळे माणसाचा अहंकार गळून पडला आणि त्याचे मन रिते झाले असे माहुलकर म्हणतात. माणूस आता दुसरा अहंकार शोधण्याच्या प्रयत्नात असून त्यातून दोन दिशांनी तो त्याचे मन घडवीत आहे. त्यामध्ये प्रगतिवादी व निराशावादी अशा दोन दिशांमधून माणसाचे मन प्रवास करीत आहे असे सांगून प्रगतिवादी मन मार्क्सवादाच्या व निराशावादी मन अस्तित्ववादाच्या दिशेने जाते असा माहुलकरांनी एक विचार मांडलेला दिसतो.

जून-जुलै ५०च्या 'अभिरुची'मधील 'पाश्चात्त्य कलावाद' या लेखामध्ये कलावादाचा समग्र विचार त्यांनी केला आहे. फ्रान्सच्या 'गोतिए' या कवी ने १८४९ मध्ये प्रथम 'कलेसाठी कला' हे सूत्र उच्चारले असे सांगून ऑस्कर वाइल्ड, शॉ, इब्सेन यांच्या कलावादाचा या लेखामध्ये संपूर्ण विचार केलेला आहे. ऑस्कर वाइल्ड आणि इब्सेन या दोघांनाही येशू ख्रिस्ताचे 'व्यक्तिवादी', 'बंडखोर' असे रूप जास्त मोहवते. त्या दोघांनाही बंडखोरांच्या त्वेषामध्ये ''सीझरत्व''च संपवणाऱ्या व्यक्तिवादामध्ये आणि माणसांच्या भावनांचे दमन करण्यापेक्षा त्यांच्या भावनांचे उन्नयन करणाऱ्या येशू ख्रिस्ताच्या विचारांमध्ये मानवाच्या व्यक्तिमत्वाचे पूर्णत्व दिसले. असा माहुलकरांनी यात विचार मांडला होता.

या लेखांमधून नव्या भूमिकेची, नव्या समीक्षेची आणि मुख्य म्हणजे नव्याने

कराव्या लागणाऱ्या सखोल अभ्यासाची गरज माहुलकर सरांनी दाखवून दिली होती. त्यांच्या या भूमिकेची चर्चा झाली नाही हे मराठीतील वाङ्मयीन वातावरणाचे दुर्दैव होते. भवभूतीप्रमाणे 'कालोऽह्ययं निरवधि:' असे म्हणत 'समानधर्मा' त्यांनी शोधला नाही, पण त्यांच्या मराठी लेखनाची कदर मराठीमध्ये झाली नाही ही मराठी समीक्षेमधील मोठी उणीव आहे.

त्यांच्या इतर मराठी लेखनाकडे पाहिले तर त्यातही ललित लेखनाचा अंतर्भाव फारसा झालेला दिसत नाही. बऱ्याच वर्षांपूर्वी 'समाधीवरील फुले'' या त्यांच्या छोट्याशा पुस्तकात विल्यम जोन्स, दारा शुको अशा व्यक्तींची चरित्रचित्रणे त्यांनी केली होती. किशोरवयीन मुलांना माहिती मिळावी हा या पुस्तकाचा हेतू होता. 'सहविचार' या बडोद्यातील साहित्यिक नियतकालिकाचे संपादक आणि लेखक म्हणूनही त्यांनी काही काळ काम पाहिले होते.

या साऱ्या मराठी लेखनामध्ये सरांचा सर्वात महत्त्वाचा आणि चिरस्थायी ग्रंथ म्हणजे ''वृद्धि: भाषेचे आणि भाषाभ्यासाचे विकसन'' हा नुकताच म्हणजे जागतिक मराठीदिनाच्या निमित्ताने २७ फेब्रुवारी २००० रोजी प्रसिद्ध झालेला ग्रंथ. राज्य मराठी विकास संस्थेने हा ग्रंथ प्रकाशित केला आहे. भाषाविषयक विचारांची चर्चा त्यामध्ये समाविष्ट आहे. या ग्रंथाच्या शेवटी 'ब्लर्ब'मध्ये पाठच्या पानावर सरांनी त्यांच्या भूमिकेचा सारांश मांडलेला आहे. ते लिहितात 'वृद्धि:' हा शब्द गणिती अर्थाचा आहे. त्याचा अर्थ वाढ, विकास असा आहे. पाणिनीचा अभ्यासविषय 'भाषा' होता. आपल्या या अभ्यास विषयाच्या अंतररंगात त्याला तिचं जे दर्शन झालं ते तिच्या सदैव नवनिर्मितिक्षम तत्त्वाचं, या तत्त्वांचं द्योतक म्हणून त्यानं हा शब्द वापरला'' सरांची मातृभाषा मराठी होती तरी त्यांच्या अभ्यासाची आणि आविष्काराची भाषा इंग्रजी होती. पण या लेखनातील मराठीची सुबोधता पाहिली की सरांनी मराठीत फार कमी लिहिले आहे याची खंत वाटते. काही समारंभांना औचित्याचे भाग्य लाभलेले असते. या ग्रंथाचा प्रकाशन सोहळा 'राज्य मराठी विकास संस्था', 'मराठी अकादमी' बडोदे आणि 'म.स. विद्यापीठातील मराठी विभाग' यांच्या संयुक्त प्रयत्नांनी बडोद्यात साजरा झाला. माहुलकर सरांच्या प्रकृतीच्या कारणामुळे ते या समारंभाला उपस्थित राहू शकले नाहीत. ही हुरहूर प्रत्येक श्रोत्याच्या मनात होती. पण तरीही त्यांनी लिहून दिलेल्या भाषणातून त्यांच्या शब्दांना असलेल्या आत्म्याच्या आवाजाचे वजन श्रोत्यांना जाणवत होते. त्यातील शेवटचे विरामाचे सूर श्रोत्यांना कासावीस करून टाकणारे होते ''शेक्सपीयरने शेवटी आपली जादूची लेखणी मोडून





अनुक्रमणिका

वाळूत पुरून टाकली, तसा हा माझ्या लेखणीचा शेवट असावा.'' अशा पारदर्शी शब्दांमधून निरवानिरवीचे सूर ऐकू येत होते. सरांच्या आजवरच्या झळझळीत जीवनेच्छेच्या समोर हे सूर उदास विसंवादी वाटत होते. पण त्यांच्या आजाराचे एकंदर स्वरूप ठाऊक असणाऱ्यांची मनाची तयारी झाली होती. म्हणूनच त्यांच्या ग्रंथाच्या प्रकाशनाची ही योजना वेळ योग्य आणि मनाला दिलासा देणारी होती असे आज वाटते. या योगाबद्दल एक समाधानही मनात आहे.

सर्वश्रेष्ठ जीवनतत्त्वांची बूज राखत संपूर्ण आयुष्यभर ज्ञानसाधना करणाऱ्या माहुलकर सरांसारखं निर्भरशील जगणं फार कठीण असतं. त्यांच्या 'स्वसंवाद' या लेखातून व्यक्त झालेले विचार पाहिले की त्यांच्या नैतिक भूमिकेमागील प्रखर निष्ठेचा अर्थ लक्षात येतो. या लेखात त्यांनी म्हटले आहे, ''पूर्वीच्या स्वातंत्र्यसंग्रामाची मुहूर्तमेढ शाळा-कॉलेजातील तरुणांनीच रचली. आज आमच्या विद्यापीठात असं काही घडेल ही आशा व्यर्थ आहे. ढोंगीपणा आणि व्यक्तिपूजा यांची ही आगरं बनली आहेत. पुन्हा एकदा आपली नजर लेखणीकडे वळायला हवी. ज्यांनी लेखणीचा धंदा स्वीकारला आहे त्यांना सांगावेसे वाटते, ढोंगाविरुद्ध जनतेला तयार करा, आणि व्यक्तिपूजेचं ताट तुमच्या दाराशी आलं तरी उधळून द्या पण ढोंग आणि व्यक्तिपूजा जिथं पिकत नाही असं स्थान आहे का?''

ही त्यांची नैतिक भूमिका आणि त्यांचे आयुष्य यामधील एकसंधता विस्मयकारक होती. यशाच्या सोप्या मार्गावरून जाण्याचा मोह त्यांना कधी झाला नाही कारण आत्मसंतुष्टी त्यांच्या स्वभावात नव्हती; आणि कोणत्याही राजकीय वा सामाजिक मान्यतेचा हव्यास नव्हता. स्वत:ला वेगवेगळ्या दिशांनी वाढवीत नेणं हेच त्यांना गरजेचं वाटे, त्यामुळे हीन पातळीवरील जीवनपद्धतीबद्दलची प्रतिक्रिया ते तीव्रपणाने व्यक्त करीत असत; त्यातही अभिनिवेश किंवा आक्रस्ताळीपणा नसे कारण अशा वृत्तीचा त्यांना उबग येई.

सरांनी आम्हाला काय दिलं याचा विचार करताना लक्षात येतं, व्यक्तिमत्त्वातील थिटेपणाला दूर करून वृत्तीतल्या खुजेपणाला ओलांडून, स्वत:ला विकसित कसं करीत जावं याचा वस्तुपाठ दिला. तत्त्वांना, संस्कारांना केवळ सैद्धांतिक स्वरूप न देता त्यांचे उपयोजन आयुष्यात कसे करावे हे स्वत:च्या उदाहरणाने दाखवून दिले. आपले जगण्याविषयीचे भान सतत जागे ठेवले आणि त्यामधून इतरांनाही समृद्ध केले. कोणत्याही विषयामध्ये त्याच्या गाभ्याला स्पर्श करणारा परिपूर्ण अभ्यास असावा ही समज दिली.





अनुक्रमणिका

त्याबद्दल त्यांच्या अखंड ऋणात राहायला आम्हाला आवडेल.

शेवटी एकच म्हणावेसे वाटते की चातकाच्या चोचीतून टिपलेल्या पावसाच्या थेंबांनी त्याची तहान भागली तरी पावसाच्या धारांचे ते मोजमाप नव्हे; त्यांचे अनंतत्व अपार असते. सरांच्या व्यक्तिमत्त्वाचे मोठेपणही असेच मोजमाप घेता न येणारे आहे.

□□□

**मराठी विभाग, महाराजा सयाजीराव विद्यापीठ, बडोदे**

---

**कानी पडलेला संवाद**

**१) अडाणी प्रतिक्रिया**

माझी एक सख्खी नातलग नुकतीच जपानला तिच्या मुलाकडे जाऊन आली. ती जपानला गेल्येय हे कळल्यावर एकजण कौतुका मिश्रित आश्चर्यानं पटकन उद्‌गारले :

''अरे, तिला इंग्रजीपण नीट येत नाही बोलता, आणि ती जपानला गेली !''

आता, जपानला जायला इंग्रजी कशाला यायला हवं ? पण मानसिक गुलामगिरीपुढे **इलाज नाही .**

**२) सुजाण प्रतिक्रिया**

एक मुलगी आपल्या वडिलांबरोबर एकदा पोष्टात गेली होती. असेल ती आठ-दहा वर्षांची. वडिलांचं काम चाललेलं असताना तिची नजर इकडे तिकडे फिरत होती. तिथल्या पाट्या, सूचना ती मुलगी वाचत होती. तेव्हा 'रवाना' हा शब्द तिच्या नजरेला पडला. पार्सल रवाना करण्याविषयी काहीतरी माहिती होती. या मुलीनं वडिलांना विचारलं, ''हा शब्द 'रवाना' आहे की 'खाना'?'' त्यांनी या शंकेला स्पष्टीकरण दिलं ते असे, ''अगं हे पोष्ट ऑफिस आहे, इथून पत्रं वगैरे पाठवली जातात, रवाना होतात. हे हॉटेल आहे का 'खाना' हा शब्ध इथे टाकायला? '' हे प्रासंगिक स्पष्टीकरण देऊन झाल्यावर त्यांनी तिला पुढे सांगितलं, ''खाण्यातला 'ख' असेल तर त्या अक्षरावरची शिरोरेखा सलग असते. जर 'र' आणि 'व' सुटेसुटे पाठोपाठ असतील तर त्यांच्या शिरोरेखा तुटक, त्या त्या अक्षरापुरत्या असतात, जसं 'र वा आण' पण; 'शिरा खा.' ''

हे खरे भाषासंस्कार.

**प्रेषक : विजया देव**

---





अनुक्रमणिका

# डॉ. द.न. गोखले यांचा भाषाविवेक

जयंत वष्ट

मराठी भाषा, भाषेची लेखनपद्धती, शुद्धता, व्याकरण या दृष्टीने पाहता आपली सध्याची अवस्था फारशी स्पृहणीय नाही हे सातत्याने जाणवते आहे. जेथे पाहावे तेथे मग ते दूरदर्शवरून दिसणारे लेखन असो वा गावातील दुकानांच्या रस्त्यांच्या नावाच्या पाट्या असोत, शुद्धलेखनाच्या नावाने आनंदच आहे. यात सुधारणा होण्याची आवश्यकता काहींना तरी वाटते आहे, आशेचा किरण. काही संस्था आणि व्यक्ती यासाठी मनापासून प्रयत्न करीत आहेत. अशांच्या दृष्टीने पाहता डॉ. द. न. गोखले यांच्या नुकत्याच २७ जून २००० रोजी झालेल्या निधनामुळे त्यांचा एक मार्गदर्शक, साक्षेपी अभ्यासक, भाषाशास्त्रज्ञ आपण सर्वांनी गमावला आहे. डॉ. गोखले या संदर्भात शेवटपर्यंत किती जागरूक होते हे त्यांच्या निधनोत्तर प्रसिद्ध झालेल्या 'भाषा आणि जीवन' च्या ताज्या अंकातील (१८ : १ : हिवाळा २०००) गोखल्यांच्या 'प्रमाणभाषेच्या भवितव्याविषयी' या लेखातूनही केवळ अभ्यासकांच्याच नव्हे तर सर्वसामान्य वाचकांच्याही लक्षात आल्यावाचून राहणार नाही. आपण नेमके काय गमावले ते हा लेख वाचताना कळते.

डॉ. द. न. गोखले हे गेली चाळीसहून अधिक वर्षे प्रमाणभाषा, व्याकरण, शुद्धलेखन, शिक्षण यांचा अभ्यास करणारे हाडाचे शिक्षक होते. विद्यार्थी, पालक आणि शिक्षक यांच्या साहाय्याने प्रत्येक पिढीच्या भाषाज्ञानाला व शुद्धतेला योग्य दिशा देण्याचा त्यांचा प्रयत्न होता. नव्या पिढ्यांना भाषिक संचित योग्य त्या कालानुसार होणाऱ्या परिवर्तनासह देण्याचे व ते सतत वाढत कसे राहील हे कर्तव्यबुद्धीने पाहण्याचे व्रत घेतलेले ते अभ्यासक होते. सत्त्वशीला सामंत यांच्या 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' या पुस्तकाचे त्यांनी लोकसत्तेच्या माध्यमातून दोन लेख लिहून केलेले परीक्षण या दृष्टीने वाचकांच्या लक्षात राहणारे व डॉ. गोखले यांच्या भाषाविचार प्रक्रियेची ओळख करून देणारे होते. जुन्या संस्कृत शुद्धलेखन विचारातील, व्याकरण विचाराचा पारंपरिक मूळ पाया ढासळू न देता पण आजच्या काळास अवश्यक असे परिवर्तन त्यात करून निर्माण होणारी भाषा व लेखनपद्धती लक्षात घेऊन ती सुबोध, साधार व शक्य तेवढ्या





अनुक्रमणिका

सोप्या पद्धतीने कशी सांगता येईल हे ते पाहात होते. हा विवेक ते साधू शकत होते. शिक्षकांनी केवळ मराठी भाषा विषयच नव्हे तर मराठी माध्यमातून अन्य विषय शिकवीत असताना, विद्यार्थ्यांच्या उत्तर-पत्रिका तपासत असताना त्या त्या विषयाच्या ज्ञानाबरोबरच लेखनातील शुद्धताही पाहावी असे त्यांना वाटत होते. ते जी मते मांडत त्यामागे सखोल चिंतन, तर्कशुद्ध विचारशृंखला असे. प्रसंगी एखाद्याचे म्हणणे अधिक योग्य वाटल्यास स्वत:च्या विचारांत योग्य ते परिवर्तन करण्यासही ते तयार असत. अशा अभ्यासकांची शिक्षकांना आज मार्गदर्शक म्हणून नितांत आवश्यकता असताना हा दीपस्तंभ ढासळला आहे.

१९५२ मध्ये ''डॉ. श्री. व्यं केतकर'' यांनी विषयावर पीएच.डी. प्राप्त केल्यानंतर आयुष्यात शिक्षकच होण्याच्या प्रेरणेने त्यांनी बी. टी. चा अभ्यास केला तेव्हा जरी शिक्षक म्हणून थोडा अनुभव गाठीशी असला तरी शिक्षण शास्त्रातील विविध विचारांचा अभ्यास केला. त्यावेळी आपल्या वार्षिक परीक्षेचा पाठ त्यांनी डॉ. प्र.ल.गावडे शिकवीत असलेल्या नू.म.वि.च्या ९ एच्या वर्गावर जो घेतला त्यासाठी व्याकरणातील एक जटिल विषय निवडलेला होता. डॉ. गावडे म्हणतात, या पाठासाठी त्यांनी जे युनिट निवडले होते ते पाहून मला पाठाच्या रंजकतेबद्दल थोडी साशंकताच वाटत होती. व्याकरणातील काही वृत्ते त्यांनी पाठासाठी निवडली होती असे मला आठवते. व्याकरण विषयावरील पाठ घेण्याचे धाडस शिक्षक सहसा करीत नसत. त्यातही वार्षिक परीक्षेला व्याकरणावर पाठ घेणारे शिक्षक विरळाच परंतु वार्षिक परीक्षेचा ते पाठ संपल्यावर गोखल्यांचं
विरळेपण, वेगळेपण प्रकर्षाने मला जाणवले. त्यांचं नि आपलं शैक्षाणिक नातं जुळेल असं त्याच वेळी मला वाटलं, आणि तसं ते पुढे जुळलंही. (व्यक्तिविमर्शक डॉ. द. न. गोखले : संपा. जयंत वष्ट लेख: शिक्षणतज्ज्ञ व प्रशासक डॉ. द.न.गोखले : प्रा. डॉ. प्र. ल. गावडे पृ. १६३) गोखल्यांच्या अंगात भाषा विषय किती आणि केव्हापासून भिनलेला होता ते येथे जाणवते. त्यांच्या शैक्षणिक विचारांचा पाया कोठपासून होता हे कळते. शिक्षकांसाठीच्या, शुद्धलेखन समितीच्या निमित्ताने प्रा.प्र.शं.जोशी, मो. रा. वाळंबे यांच्यासारख्या सहकाऱ्यांबरोबर विचारविनियम, चर्चा करता करता, अनेक शिबिरे, लेख, शिक्षकांना मार्गदर्शन या मार्गाने जाता जाता शेवटी डॉ. गोखल्यांचा 'शुद्धलेखन विवेक' १९९३ मध्ये एकसंघ, एकत्रितपणे प्रकाशित झाला.




अनुक्रमणिका

१९५३ ला बी.टी.ला असताना, ५५-५६ मध्ये साताऱ्याच्या न्यू इंग्लिश स्कूलमध्ये, १९५९ मधल्या 'लोकशिक्षण माले' तर्फे दिलेल्या व्याख्यानांतून State control in secondarys education च्या निमित्ताने शिक्षणविषयक विचार गोखले जसे मांडत होते तसेच ते शुद्धलेखन विचारही मांडत होते. १९६१ मध्ये केंद्र सरकारच्या इन्स्त्रपग च्या टिळक कॉलेज ऑफ एज्युकेशन शाखेच्या वतीने घेतल्या गेलेल्या शुद्धलेखनावरील तीनपैकी दोन कृतिसत्रांत ते मार्गदर्शक होते. तेव्हा त्यांनी मांडलेले लेखन विचार १९६२मध्ये महाराष्ट्र शासनाने मान्य केलेल्या शुद्धलेखनविषयक नियमावलीला सहायक ठरल्याचे दिसते. भाषारचनेच्या अभ्यासाविषयी व मराठी पाठ्यपुस्तकाचे स्वरूप, भाषा आणि रचना याविषयी त्यांनी १९६३ मध्ये साताऱ्याच्या मराठी साहित्य संमेलनात सादर केलेले निबंध प्रसिद्ध साहित्यिक व शिक्षणाधिकारी वि. द. घाटे यांना अतिशय मोलाचे वाटले होते.

१९६९-७० मध्ये जसे त्यांनी परीक्षांच्या सुधारणाविषयी विचार मांडले तसेच 'भाषिक व्यवहारातील विवेक' वा 'भाषाशोधन' या नावाने १९८७-८८ मध्ये भाषाविचार ही व्यक्त केले. सुशिक्षितांच्या रोज वापरल्या जाणाऱ्या भाषेत होणाऱ्या प्रयोगांचा परामर्श त्यांनी यावेळी घेतला. तर १९९० मध्ये शुद्धलेखनाचा पुनर्विचार करण्यासाठी मराठी साहित्य महामंडळाने नेमलेल्या समितीच्या वतीने डॉ.गं.ना. जोगळेकर यांनी पाठविलेल्या प्रश्नावलीला डॉ. गोखले यांनी प्रदीर्घ उत्तर दिले. या साऱ्याचे 'नवनीत' १९९३ मध्ये शुद्धलेखन-विवेक च्या रूपाने प्रसिद्ध केले. यात त्यांनी व्यक्त केलेले विचार कदाचित तज्ज्ञांना फारसे नवे वाटतील, असे नाही. पण सर्वसामान्य जिज्ञासूंना ते विचारास प्रवृत्त करतील आणि थोडेफार नवे, क्वचित धक्का देणारे वाटतील (शुद्धलेखन-विवेक, प्रस्तावना, पृ. नऊ) अशी कल्पना त्यांनी या निमित्ताने व्यक्त केली. शुद्धलेखनविषयक एक एकसंघ, एकरूप, एकात्मविचार व्यूह मांडण्याचा डॉ. गोखले यांचा हा प्रयत्न निश्चितच शिक्षकांच्या पुढील पिढ्यांना मार्गदर्शक ठरेल असे वाटते. भाषा, तिचे नियम व काळानुसार आवश्यक नवता या तिन्ही अंगांचा विचार करून शुद्धलेखनाचे परिवर्धित नियम गोखले यांनी येथे सिद्ध केले आहेत. सर्वसामान्य लेखकांच्या गरजा निदान काही प्रमाणात तरी पूर्ण करता याव्यात यासाठीची ही सारी धडपड आहे. ही करत असताना ते एकाच काळातील म्हणजे आजच्या काळातील भाषेचे देशभेद व स्तरभेद विचारात घेऊन नंतर शुद्धलेखनाच्या

आधारभाषेचा, प्रमाणभाषेचा विचार करताना दिसतात. शुद्धलेखनाच्या नियमांत आढळणाऱ्या परस्पर विसंगतीची कारणे शोधू पाहताना आणि भाषेमध्ये धीम्या गतीने, पूर्ण सातत्याने होणारे परिवर्तन लक्षात घेता घेता तीमधील स्थिरताही जपण्याची आवश्यकताही प्रतिपादन करण्यास विसरत नाहीत.

'शुद्धलेखन-विवेक' मध्ये केलेल्या चर्चेतून शिक्षकांना साहाय्य होईल पण मुलांना त्याचा उपयोग फारसा होणार नाही, असे वाटल्याने मुलांसाठी १९९४ मध्ये 'नवशक्ती' तून डॉ. गोखल्यांनी शुद्धलेखनविषयक लेखन केले. या बारा लेखांतून माध्यामिक शाळेतील मुलांसाठी त्यांच्या स्तरावरील शुद्धलेखनाविषयी व ते कसे शिकवावे या विषयीची चर्चा केली. यातून सुलभ शुद्धलेखन हे छोटेखानी पुस्तक निर्माण झाले. यात 'सुलभ शुद्धलेखना' तून शिक्षकांना 'प्रमाण भाषे' ने रूप ध्यानात घेण्याविषयी त्यांनी सांगितले आहे. डॉ. गोखले म्हणतात, ''या पुस्तकात 'प्रमाण भाषेचा' पुरस्कार केला असून तोच साऱ्या शुद्धलेखनाचा आधार मानला आहे. 'प्रमाणभाषेचे खरेखुरे स्वरूप जर लक्षात घेतले तर तीमध्ये व्युत्पत्ती, व्याकरण, शिष्टांचे सयोचित भाषण वगैरेंचा योग्य तेवढा अर्क उतरलेला असतो, हे ध्यानी येईल. किंबहुना, व्युत्पत्ती व्याकरण वगैरे 'प्रमाण भाषे' वर अवलंबून असतात, हे उमगू शकेल. प्रमाणभाषा आपल्या लेखनात व भाषणात विद्यार्थ्यांनी उतरावी म्हणून प्रयत्न करण्याचे कर्तव्य शिक्षक बंधु-भगिनींनी मनोभावे करावे, ही नम्र विनंती.'' (सुलभ शुद्धलेखन, प्रस्तावना).

एका बाजूला मराठीचे लेखन करणाऱ्या भावी पिढ्यांविषयी ते जसे जागरूक होते तसेच सध्या लिहिणाऱ्यांच्या प्रकाशित पुस्तकांतील शुद्धलेखनाकडेही ते पाहात होते. वृत्तपत्रे वा नियतकालिकांपेक्षा वैचारिक ग्रंथातील भाषा व तिचे लेखन शास्त्राधारेच व्हावयास हवे, यावर त्यांचा कटाक्ष असे. ग्रंथांची वाङ्मयीन समीक्षा व्हावी, भाषिक समीक्षा करायची पाळी येऊ नये, असे त्यांना वाटत होते. भाषिकदृष्ट्या ग्रंथलेखन हे परिपूर्णच हवे अशी त्यांची अपेक्षा असे. तशी ती सर्वांचीच असते. पण गोखले याकडे विशेष लक्ष देणाऱ्यांपैकी होते. भाषिक समीक्षेत गुणदोष सांगताना वा सरस-नीरस ठरविताना किंवा प्रतवारी लावताना समीक्षकाला काही मानदंड अभिप्रेत असलाच पाहिजे असे ते मानीत आणि ते तसे आढळले नाही तर ते मात्र त्यांना सहन होत नसे. याच वर्षी प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या चरित्र-आत्मचरित्रविषयक समीक्षा लेख संग्रहात 'चरित्र-चिंतन'





अनुक्रमणिका

मध्ये याचा प्रत्यय येतो. मराठीला लाभलेला एक अनन्वय अलंकार' या लेखातून त्यांनी प्रा. डॉ. भालचंद्र फडके यांच्या 'डॉ.आंबेडकर' या ग्रंथाची भाषिक समीक्षा केली आहे. या ग्रंथात भाषेचे लेखनसंकेत न पाळणे, टीपा नीट न देणे, शब्द नीट न तोडणे, विशिष्ट संदर्भात वाक्यामध्ये अध्याहृत पदे ठेवण्याची पद्धती वा तो 'विशिष्ट संदर्भ' न पाळणे, लुप्तपदत्व एवढेच नव्हे तर दोषास्पद वाक्यरचना इ. अनेक गोष्टींवर बोट ठेवत डॉ. गोखले ही भाषा अनेक दोषांनी 'लिडबिडलेली' (गोखल्यांचा शब्द) आहे हे रोखठोकपणे मांडून ते पुढे म्हणतात, ''या पुस्तकातील भाषादोषांचे विविधत्व, विपुलत्व नि गांभीर्य लक्षात घेता असे वाटते की भारदस्त नि प्रौढ मराठी वाङ्मयात अलीकडच्या दहा पंधरा वर्षांत असे दुसरे पुस्तक निपजले नसावे. (चरित्र-चिंतन, पृ. १०२)

येथे एक गोष्ट वैशिष्ट्यपूर्ण म्हणून नमूद करावीशी वाटते की 'डॉ. केतकर' या आपल्या ग्रंथात डॉ. गोखले यांनी आपण ग्रंथात कोणते शुद्धलेखन वापरले आहे या विषयीची टीप दिली होती. त्यांच्या प्रारंभापासूनच्या ग्रंथ गतप्रमाण भाषेच्या विचाराच्या संदर्भात त्यांचे डॉ. फडके यांच्या ग्रंथाविषयीचे विचार लक्षणीय आहेत. हे सारे थोड्या विस्ताराने एवढ्यासाठीच सांगायचे की लेखनात शुद्धलेखनाच्या चुका सापडल्या की आपल्या तळपायाची आग मस्तकात जाते म्हणणारे पूर्वीचे भाषाविद् आणि डॉ. गोखले यांची जातकुळी एकच आणि आजच्या काळात ती सर्वार्थाने गरजेची. ही परंपरा आता तुटली असे वाटू लागले आहे. म्हणून प्रारंभी जे म्हटले की आपण नेमके काय गमावले! तर ते हे. या पुढील काळात या साऱ्या गोष्टी स्मरणात ठेवून पुढच्या पिढ्यांची भाषा जर शुद्ध, दर्जेदार व नियमानुसार राहण्यासाठी आमच्या पिढीने मनापासून जर काही प्रयत्न केला तर ती खऱ्या अर्थाने डॉ. गोखले यांना वाहिलेली श्रद्धांजली ठरेल.

येथे प्रामुख्याने डॉ. गोखले यांच्या भाषेचे अध्यापन आणि शुद्धलेखन या संदर्भातील कार्याबाबत अपेक्षित असल्याने चरित्रकार गोखले, शिक्षणतज्ज्ञ गोखले, संपादक गोखले, व्यक्तिविमर्शक गोखले, हिदुत्वनिष्ठ गोखले हे विषय आलेले नाहीत, याची मला पूर्ण जाणीव आहे. ते लेखन इतरत्र करण्याचा मानस आहे.

□□□

**९ कमल कुंज, सवितानंद सोसायटी,**
**आनंद नगर, सिंहगड रोड, पुणे-४११ ०५१.**

# मराठी लेखनाची 'दूरावस्था'

सत्त्वशीला सामंत

*[✲ या लेखाचे शुद्धलेखन अगदी अपवाद म्हणून लेखिकेच्या हस्तलिखिताला अनुसरून जुनेच ठेवले आहे. जुन्या शुद्धलेखनाचा तोंडवळा नव्या पिढीतल्या वाचकांना त्यामुळे कळावा. मात्र हा पायंडा म्हणून मानू नये. पत्रिकेचे ते धोरण नव्हे हे ध्यानात घ्यावे - संपादक ]*

१९९६ साली 'भाषा आणि जीवन' मध्ये, 'उच्चारणसंकेत आणि लेखनसंकेत यांचा ताळमेळ' या शीर्षकाखाली माझा एक लेख प्रसिद्ध झाला होता. (वर्ष १४ : अंक २ : उन्हाळा १९९६). तसेच, अलीकडे १९९९ साली श्री. दिवाकर मोहनी यांनी 'भाषा आणि जीवन' मधून 'समस्त भाषाप्रेमींना अनावृत पत्र' लिहिले. (वर्ष १७ : अंक३ : पावसाळा १९९९). त्यानंतर 'भाषा आणि जीवन' च्या ताज्या अंकात (वर्ष१८: अंक१: हिवाळा २०००) प्रा. मा. ना. आचार्य यांनी माझ्या 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' या पुस्तकावर परीक्षणलेख लिहिलेला असून, त्याच अंकात (कै.) डॉ. द. न. गोखले यांनी श्री. मोहनी यांच्या उत्तरादाखल 'प्रमाण मराठीच्या भवितव्याविषयी' या मथळ्याखाली लिहिलेला प्रतिवादलेख प्रसिद्ध झालेला आहे. त्याचप्रमाणे, अगदी अलीकडे फेब्रु. ते मार्च २००० या काळात 'दै. लोकसत्ता' मधून 'कैफियत अनुस्वारांची आम्हांला वगळा, गतप्रभ झणीं होतील काव्यांगणें' या मथळ्याखाली माझे तीन लेखांक प्रसिद्ध झाले व त्यांमध्ये, जुन्या काव्यातील आणि आधुनिक काळातही आपल्या काव्यातून व्याकरणसिद्ध अनुस्वार प्राणपणाने जपणाऱ्या (ना. घ. देशपांडे, इंदिरा संत, आदिकरून) कवींच्या कवितांतील अनुस्वार वगळल्यास कसा अर्थविपर्यास होतो याची मी अनेक उदाहरणे दिली होती. त्यावर माझ्या विरोधात, डॉ. द. न. गोखले यांनी 'अनुस्वारांचा कबुलीजबाब- आम्हाला वगळा, ती न पडती निस्तेज लेखांकने' आणि 'व्याकरणाचा रणगाडा कशाला?' असे दोन लेखांक लिहिले व अखेरीस 'कबुलीजबाब- अनुस्वारांचा की महामंडळाचा?' हा माझा समारोपलेख प्रसिद्ध झाला. यावरून, एका बाजूला डॉ. गोखले, डॉ. आचार्य व (डॉ. गं.ना. जोगळेकर यांच्यासारखे) इतर बहुसंख्य अतिरथी- महारथी आणि विरुद्ध बाजूला श्री. दिवाकर मोहनी आणि मी स्वत: या दोघांचा अल्पमतातला पक्ष असे चित्र

उभे राहिलेले दिसते. आम्हां सर्वांच्या या सवाल-जबाबांच्या पार्श्वभूमीवर, डॉ. गोखले व डॉ.आचार्य या दोघांच्या लेखांच्या अनुषंगाने आमच्या पक्षाची निर्वाणीची भूमिका वाचकांसमोर एकदाच काय ती निर्णायकपणे मांडावी या हेतूने या लेखाचा प्रपंच केला आहे.

आमच्या पक्षाच्या भूमिकेचा सारांश असा की- आधी बोलभाषा व मग लेखन, आधी भाषा व मग व्याकरण हा निसर्गक्रम असला तरी, मानवी समाजाची लेखनकला वाढीला लागून त्याची संस्कृती जसजशी समृद्ध होऊं लागली तसतसे सार्वजनिक लेखनव्यवहाराचे प्रयोजन उपस्थित झाले. आधुनिक काळात, मानवी उच्चारण (articulation )हुबेहूब प्रतिबिंबित करण्यासाठी ध्वनिलिपीचा (phonetic scrip) आश्रय केला जातो व परभाषा शिकताना तश्या लेखनपद्धतीचा उपयोग केला जातो.परंतु समानभाषकांच्या आपसातील संवादव्यवहारासाठी ज्या लेखनपद्धतीचा अवलंब केला जातो ती ध्वनिलिपीहून काहीशी वेगळी असते व वेगळी असणे अपरिहार्य ठरते. कारण, उच्चारण व लेखन यांत शक्य तेथवर एकवाक्यता असणे अत्यंत श्रेयस्कर असले तरी, प्रत्यक्ष व्यवहारात उच्चारण हे व्यक्तीगणीक व प्रदेशागणीक बदलत असल्यामुळे कोणाचे उच्चारण प्रमाण मानावे हा प्रश्न उपस्थित होतो व म्हणून सार्वजनिक पातळीवर सर्वसाधारणपणे साहित्यक्षेत्रातील अभिजनांचे उच्चारण प्रमाण मानले जाते व त्यास 'शुद्धोच्चारण' किंवा 'शिष्टोच्चारण' (Pronunciation) असे म्हणतात. असे असूनहि सर्वसामान्य सार्वजनिक लेखनात शिष्टसंमत उच्चारण तंतोतंत प्रतिबिंबित होतेच असे नाही. उदा. 'ममता' आणि 'कोयता' या शब्दांचे शुद्धोच्चारण अनुक्रमें 'मम्ता' आणि 'कोयुता' (कोय्ता नव्हे) असे असले तरी, प्रत्यक्षात हे दोन्ही शब्द सारखेच लिहिले जातात. याउलट, 'खानदेश' व 'संदेश' या दोहोंचा उच्चार सारखाच असला (म्हणजे 'खांदेश') तरी दोन्ही शब्द सारख्याच पद्धतीने लिहिले जात नाहीत. म्हणजेच, शुद्धोच्चारणशास्त्र (orthoepy) व शुद्धलेखनशास्त्र (orthography) हीं दोन वेगवेगळीं शास्त्रें आहेत. कोणत्याही भाषेचे शिष्टसंमत लेखन म्हणजे शुद्धलेखन कसे असावे ते ठरवताना शुद्धोच्चारण हा एकमेव निकष असू शकत नाही, तर तो अनेकांपैकी एक निकष असतो. मराठीने स्वीकारलेली देवनागरी लिपी तर उच्चारांशी बहुतांशाने प्रामाणिक असल्यामुळे 'उच्चार' या निकषाची पूर्तता होतेच. तथापि, लेखकाच्या उच्चारांचे प्रतिबिंब दाखवणे हे लेखनव्यवहाराचे मुख्य प्रयोजन नूसन, लेखकापासून अवकाश किंवा काळ

यांच्या अंतरामुळे दुरावलेल्या वाचकापर्यंत लेखकाचे विचार पोचवणे हे मुख्य प्रयोजन असल्यामुळे इतरही निकष लागू होतात. मग उच्चाराव्यतिरिक्त अन्य निकष कोणते?

याचे उत्तर १९३० साली 'महाराष्ट्र साहित्य परिषदे' ने संमत केलेल्या शुद्धलेखन नियमावलीतील अधिकृत निवेदनात दिलेले होते - ''केवळ उच्चाराप्रमाणे शुद्धलेखन असावें हें तत्त्व या मंडळाला संमत नसून, परंपरा, वर्तमानकालीन प्रचार, व्युत्पत्ति, व्याकरण व उपयुक्तता यांचा शुद्धलेखन ठरवण्याच्या कामीं विचार करावा.'' - ('शुद्धलेखनविवेक'- डॉ. द.न. गोखले - १ली आवृत्ति १९९३ - पृ.१०) (मराठीच्या संदर्भात काळाच्या ओघात एकेक निकष गळून पडला आणि उच्चार हा एकमेव निकष उरला असून तोही आता बाद होण्याच्या मार्गावर असून, यापुढे 'स्वेच्छा' हा एकमेव निकष राहण्याची चिन्हे दिसत आहेत!)

खुद्द व्याकरणाचार्य प्रा. मा. ना. आचार्य ह्यांनी व्याकरणाची तरफदारी करण्याऐवजी, व्याकरणाचा दुय्यम दर्जा आणि उच्चारणास प्राधान्य या आपल्या मुद्द्यांच्या समर्थनासाठी लो. टिळकांचा हवाला देऊन त्यांचे एक वाक्य मुळाबरहुकूम उद्धृत केले आहे. तथापि, टिळकांनी सदर वाक्यात 'उच्चार' या निकषाबरोबर इतरही काही निकषांचा उल्लेख केलेला असूनही ते दुर्लक्षून फक्त 'उच्चार' हा शब्द जाड ठशात छापलेला आहे, पण तो ठसा प्रा. आचार्यांचा आहे, टिळकांचा नाही. मुळात टिळकांनी लिहिलेला 'वैयाकरण' हा बरोबर शब्दही 'वैय्याकरण' असा दोनदा चुकीच्या प्रकारें उद्धृत केला गेला आहे! तसेंच, साने-गोडबोले-हातवळणे यांच्या पुस्तकावरील टिळकांच्या लेखमालेतील त्याच १ ल्या लेखात आणि इतर ३ लेखांत लो. टिळक काय म्हणतात याकडे प्रा. आचार्यांचे अनवधानाने दुर्लक्ष झालेले दिसते. लो. टिळक असेही म्हणतात-

**'मराठी भाषेची लेखनपद्धति'**

**लेखांक १ ला :-**

''....... तथापि, अशा आक्षेपांनी व्याकरणशास्त्राचें, किंबहुना कोणत्याहि शास्त्राचें महत्त्व व उपयोग कमी झाला किंवा होतो असें आढळण्यांत येत नाही. नियमित सत्ता असलेला राजा आणि प्रजा यांच्यामध्यें जो संबंध असतो तोच किंवा तशा प्रकारचा (संबंध) वैयाकरण आणि भाषेतील शब्द यांच्यामध्यें आहे....''

(यापुढील भागात लो. टिळक यांनी वैयाकरण आणि ती भाषा बोलणारी जनता यांनी





अनुक्रमणिका

परस्परांवर कसा अंकुश ठेवावा याचे चांगल्या प्रकारें विवेचन केलें आहे.)

**लेखांक २ रा :-**

''कोणत्याहि भाषेची लेखनपद्धति ठरवण्यास जीं साधनें आहेत त्यांपैकीं उच्चार हें जरी एक साधन असलें, तथापि केवळ उच्चाराकडे नजर देऊन लेखनपद्धति ठरविणें कितपत प्रशस्त आहे याचा इंग्रजी भाषेंतील उदाहरणें देऊन गेल्या अंकीं थोडासा विचार केला आहे. व्युत्पत्तीकडे लक्ष न देतां, केवळ उच्चारावरून लेखनपद्धति ठरवावयाची म्हटली तर लिहिण्याची भाषा दर पंचवीस-तीस वर्षांत पालटावी लागेल. इतकेंच नव्हे तर, लिहिण्याच्या भाषेंत कांहीच कायमपणा राहावयाचा नाही. जिभेपेक्षा लेखणी जात्याच अधिक स्थिर असल्यामुळे, कोणत्याहि भाषेंतील लेखनपद्धतीस जितकें स्थैर्य असतें तितकें उच्चारपद्धतीस असत नाही; व म्हणूनच लेखनपद्धतीस हर एक भाषेंत महत्त्व देतात. लिहिणें किंवा (आणि) वाचणें यांत सारखा मेळ कधींच रहात नाहीं...''

**लेखांक ३ रा : -**

''उच्चाराप्रमाणे कोणत्याहि भाषेची लेखनपद्धति सर्वांशीं ठरविणें हें किती कठिण, किंबहुना अशक्य आहे याचा विचार गेल्या अंकीं केलाच आहे...''

(आधार : 'लो. टिळक यांचा भाषाविचार' : संपादक- श्री. य.शं. कानिटकर प्रकाशक - टिळक स्मारक ट्रस्ट, पुणे; १ ली आवृत्ति -ऑगस्ट २००० पृष्ठ क्र. ४६,५०,५५)

स्वत: लो. टिळकांनी ज्या भाषेचा दाखला दिलेला आहे ती इंग्रजी भाषा आपणां सर्वांनाच 'शिरोधार्य' आहे आणि निम्म्याहून अधिक जगावर तिचे अधिराज्य चालू आहे. पण उच्चारणातून बाद झालेल्या कितीतरी वर्णांचे ओझे लेखनसरणीच्या शिरावर लादून स्पेलिंगच्या माध्यमातून ते ओझे वाहणारे इंग्रजीभाषक आमच्या मराठी विद्वानांच्या मते खरोखरी महामूर्खच म्हणावयाचे! पण तसे उघडपणे बोलून दाखवण्याची हिंमत आमच्या एका तरी विद्वानाकडे आहे काय? इंग्रजी साहित्यक्षेत्रातही इ. स. १२०० पासून असे वादविवादांचे सामने झडले आहेत; तेथेही Simplified Spelling Society यांसारख्या संस्थांनी चळवळी केल्या आहेत, पण अजून तरी त्यांची सरशी झालेली नाही. लँकॅस्टर विद्यापीठातील इंग्रजीचे प्राध्यापक व प्रख्यात भाषाभ्यासक मि.स्टॅन्ली हसे यांनी The English Language - structure & Development(१९९५) या मथळ्याचे एक पुस्तक लिहिलेले असून, त्यातील ५ व्या प्रकरणात त्यांनी शुद्धोच्चारण व शुद्धलेखन यांचे





अनुक्रमणिका

परस्परांशी काय नाते आहे व असावे याची चर्चा केली आहे. शुद्धोचारण व शुद्धलेखन या दोहोंत एकवाक्यता असणे ही आदर्श परिस्थिती होय हे सर्वमान्य आहे. पण व्यवहारात अनेक कारणांमुळे तसे घडूं शकत नाही. म्हणून इंग्रजी कोशकारांनी इंग्रजी कोशात प्रथम सार्वजनिक लेखन-व्यवहारातील रूढ स्पेलिंग व कंसात उच्चाराचे वर्णलेखन (उदा. plam\'päm\) देण्याची प्रथा सुरू केली. महंमद पर्वताकडे गेला नाही तर, पर्वत महंमदाकडे जातो या चालीवर उच्चाराने स्पेलिंगशी जुळवून घ्यावे की स्पेलिंगने उच्चाराशी जुळवून घ्यावे असा यक्षप्रश्न कोशकारांपुढे उभा राहिला होता. तेव्हा Critical Pronouncing Dictionary of the English Language (इ.स. १७९१) या कोशाचा लेखक मि. जॉन वॉकर यांच्यासारख्या वक्तृत्वकलेच्या पुरस्कर्त्यांनीही स्पेलिंगच्या बाजूने कौल दिला असे प्रा. हसे म्हणतात-, "He (John Walker) is too ready to ignore usage and revere spelling." त्यानंतर लगेचच त्यांनी वॉकरचे ('वॉल्कर' नव्हे!) एक अर्थगर्भ वाक्य उद्धृत केले आहे:-

"..... for if we cannot bring the pronunciation to the spelling, it is looked upon as same improvement to bring the spelling to the pronunciation : a most permicious practice in language." (पृ. ११८)

यापुढील भागात Spelling Reform या विषयाची चर्चा करताना, प्रा. हसे म्हणतात -

"..... Every once in a while today, a new proposal for reform is put forward. We must, though (however), decide whether spelling reform means the complete revision of our spelling on a more or less phonetic basis or whether it means the gradual elimination of a number of irregularities, such as silent letters, in the interests of a more logical spelling. The latter is rather like the American writing of <check> ('cheque'), <center>, <honor>, <dialog> and <theater>. This second solution would be better, but the reformers usually intend the first. American spelling, however, is not without its own ambiguities. The regular <license> and <practise> obscures the grammatical distinction which English maintains with <licence> for the noun and <license> for the noun and < license for the verb..."-(पृ. ११८)

या त्यांच्या विवेचनाचा मथितार्थ असा की, कोणत्याही भाषेची लेखनसरणी (व उच्चारसरणी देखील) अपरिवर्तनीय नसते, निसर्गक्रमानुसार ती बदलतच असते. पण काही निरर्थक व अनावश्यक गोष्टी काढून टाकावयाच्या झाल्यास, एकदम सर्वंकष क्रांती करून ते बदल घडवून आणावेत की उत्क्रांतीमार्गे हळूहळू (gradual) धीमेपणाने ते बदल घडवावेत हा वादाचा मुद्दा आहे. तथाकथित पुरोगामी सुधारणावाद्यांना बदल घडवून आणण्याची इतकी घाई झालेली असते की त्यामुळे ते मागचापुढचा विचार न करता, उतावळेपणाने बदल घडवण्याचा प्रयत्न करतात. पण उत्क्रांतीचा मार्ग अधिक श्रेयस्कर होय असे प्रा. हसे यांचे मत दिसते. अमेरिकन लोकांनीही इंग्रजी स्पेलिंगमध्ये जे बदल घडवले ते अत्यंत किरकोळ व निरुपद्रवी आहेत, पण काही बदलांमुळे अमेरिकन लोक शब्दांची सूक्ष्म अर्थभेदक शक्ती गमावून बसले आहेत असाही अभिप्राय प्रा. हसे व्यक्त करतात. (अमेरिकन लोकांनीही अजून तरी palm मधील 'L' किंवा psyche मधील 'स्र' वर्ण उडवलेला नाही !)

मराठीच्या क्षेत्रात १९६२ साली जी अघटित क्रांती घडून आली तिच्यामागे तत्कालीन सरकार ही खरी प्रेरकशक्ती होती व जनसामान्यासाठी लेखनाचे 'सोपीकरण' ही खरी मूळ प्रेरणा होती. वस्तुत:, अनेक मातब्बर विद्वानांनी इतक्या झपाट्याने (drastic) बदल घडवण्यास विरोध केलेला असूनही, काही मोजक्या सरकारधार्जिण्या विद्वानांनी त्याला 'उच्चारानुसारी लेखन' असा तात्त्विक मुलामा दिला व प्रतिपक्षाचा विरोध हाणून पाडला. १९६२ सालापूर्वीपर्यंत साहित्यिक अभिजनांमध्ये जी लेखनसरणी प्रचलित होती, तीमध्ये सरकारने दंडसत्तेच्या जोरावर विद्वानांवर अलिखित दडपण आणून त्यांच्याच करवीं आमूलाग्र बदल घडवून आणला. खरे पाहतां, एखाद्या लहान बालकाचे जितक्या सहजतेने प्रौढ व्यक्तीत रूपांतर होते, एखादी नदी जितक्या नैसर्गिकपणे पुढे वाहत जाते आणि तरीही त्या बालकाची किंवा नदीची ओळख (identity) कायम राहते तितक्या सहजतेने आणि नैसर्गिकपणे हे बदल घडून यावयास हवे होते. पण मराठीच्या बाबतीत दुर्दैवाने तसे झाले नाही. गेल्या चाळीस वर्षांत सुरुवातीला सक्तीने का होईना, पण हा बदल हळूहळू सर्वांच्या इतका हातवळणीं पडला की आपण आपल्या अभिव्यक्तीची सूक्ष्मता गमावून बसलो आहोत याचेही साहित्यिक अभिजनांना भान राहिलेले नाही.

मराठीने व्युत्पत्तिसिद्ध व व्याकरणसिद्ध अनुस्वार काढून टाकल्यामुळे काही

बिघडलेले नाही, संदर्भावरून सगळे समजते हा आमच्या प्रतिपक्षाचा दावा आहे. आमच्या पक्षाचे म्हणणे असे की, व्युत्पत्तिसिद्ध व व्याकरणसिद्ध अनुस्वार हटवल्यामुळे पूर्ण संदर्भ नसेल तेव्हा किंवा संदर्भ संदिग्ध असेल तेव्हा, अनुस्वार हे अर्थभेदक चिन्ह कामास येते:-

उदा. ती व्यक्ती <u>परदेशी</u> होती. (foreigner)
ती व्यक्ती <u>परदेशीं</u> होती. (abroad)

हे अनुस्वार कायमचे हटवल्यास, लेखकाचा अभिप्राय वाचकाला कळणार नाही. काव्यामध्ये तर गद्यासारखी संपूर्ण वाक्यरचना नसल्यामुळे व कमीत कमी शब्दांत जास्तीत जास्त अर्थ व्यक्त करावयाचा असल्याने, कित्येकदा एखादा व्याकरणसिद्ध अनुस्वार हे काम करून जातो, हे मी ''दै. लोकसत्ता'' मधील माझ्या लेखांत दाखवून दिले आहे. ('व्याकरणसिद्ध अनुस्वार' म्हणजे ज्या अनुस्वाराला उच्चारदर्शन हे नव्हे तर, लिंग-वचन-विभक्ति-अर्थभेद दर्शवणें हे प्रयोजन असते तो अनुस्वार होय.) शिवाय, व्युत्पत्तिसिद्ध अनुस्वार हटवल्यामुळे, तात्पुरता कार्यभाग झाला तरी भाषेचा इतिहास पुसला जातो व आपले इतर भाषांशीही नाते तुटते.

प्रा. हसे म्हणतात -

"A new phonetic spelling system might perhaps make some sort of sense for the Present-Day English alone, but it would obscure etymological relationships with other languages whose words we have borrowed, and this would work both ways : for foreigners learning our language and for us learning theirs. Finally, how long would a new system last ? We cannot put a stop to (or even a brake on) changing pronuciation." (पृ. ११९)

एकवेळ कोणाचाही लिहिता हात थांबवता येईल, पण कोणाच्याही जिभेला आपण लगाम घालू शकत नाही हें खरेंच !

याच पुस्तकाच्या त्याच पृष्ठावर प्रा. हसे यांनी प्रख्यात इंग्रजी कोशकार डॉ. सॅम्युएल जॉन्सन (अठरावें शतक) यांचा एक व्युत्पत्ति-व-व्याकरणविषयक अभिप्राय नोंदलेला आहे :-

"In this part of the work (spelling), where caprice has long wanted without controu<u>l</u> (जुनें स्पेलिंग), and vanity fought praise by





अनुक्रमणिका

petty reformation, I have endeavoured to proceed with a scholar's reverence for antiquity, and a grammarian's regard for the genius of our tongue. I have attempted few alterations, and amongst those few, perhaps the greater part is from the modern to the ancient practice." (पृ. ११९)

याच पार्श्वभूमीवर लो. टिळकांचे विधान उद्धृत करतें :-

''वैयाकरण हे भाषेचे शास्ते खरे : पण त्यांचा अधिकार मर्यादित आहे, आणि कोणतीही भाषा बोलणारे लोक हेच जरी त्या भाषेचे कर्ते असले, तरी व्याकरणशास्त्र किंवा व्युत्पत्तिशास्त्र हें त्यांस अगदीं झुगारून देतां येत नाही. या दोन्ही गोष्टी लक्षांत ठेवून अणि उभय पक्षांचा मिलाफ घालून मग लेखनपद्धतीवाल्यांनी काय नियम ठरवायचे ते ठरविले पाहिजेत.'' (लो. टिळक यांचा भाषाविचार : पृ. ५६)

प्रा. हसे यांनी आपल्या पुस्तकात पृ. ११४-११५ वर अशीही माहिती दिली आहे की, ग्रीक आणि विशेषत: लॅटिन यांमधून व्युत्पन्न झालेले कित्येक शब्द फ्रेंचमार्गे इंग्रजीत आले व उच्चारातून बाद झालेली वर्णाक्षरे स्पेलिंगमधून गाळली जाऊन ते शब्द मध्ययुगीन इंग्रजीत अवतीर्ण झाले. पण रेनेसाँ (पुनरुज्जीवन) काळातील लेखकांनी लॅटिनला प्रतिष्ठा देऊन आपल्या मूलस्रोताशी - पितृभाषेशी आपली नाळ जोडण्यासाठी ती वर्णाक्षरे पुन्हा स्पेलिंगमध्ये दाखल केली. उदा. aventure u adventure, doute u doube, receit u receipt

(मराठीत निदान उच्चारात नसलेली वर्णाक्षरे वर्णलेखातून हटवण्याची समस्या कधी उद्भवलीच नाही. प्रश्न होता तो फक्त तथाकथित अनुच्चारित अनुस्वार हटवण्याचाच काय तो !)

सामान्य व्यवहारात व्याकरणज्ञानाची आवश्यकता नसते हे डॉ. आचार्यांचे म्हणणे खरे आहे. आपल्या घरातील नोकर 'मी जाईल' असे म्हणाला किंवा त्याने तसे खाजगी पत्रात लिहिले तरी काही बिघडत नाही. तेवढ्याने त्याचा कार्यभाग होतो. पण एखादा पत्रकार जेव्हा 'लेणीत मूर्ती कोरलेल्या आहेत' असे वृत्तपत्रातून लिहितो तेव्हा ती बाब दखलपात्र ठरते, (माझ्याकडे अशी कात्रणे आहेत.) व तेव्हा व्याकरणाचे महत्त्व प्रकर्षाने जाणवते. ना. घ. देशपांडे, इंदिरा संत, बा. भ. बोरकर यांच्यासारखे कवी आपल्या सानुस्वार कवितांतून 'हा सप्तमीचा अनुस्वार', 'हा तृतीयेचा अनुस्वार' असे

मनाशी घोकत अनुस्वार देत नव्हते. (तसे करीत बसल्यास , सुंदर कविता उत्स्फूर्तपणा जन्मालाच येणार नाही.), तर लहानपणी शिकलेल्या व्याकरणाचे त्यांच्या मनावर जे संस्कार झालेले होते त्या संस्कारांपोटीं अभावितपणे त्यांचे अर्थपूर्ण अनुस्वार बाहेर पडत असत. प्रा. हसे यांनी या संदर्भात रॉबर्ट लॉथ यांच्या इंग्रजी व्याकरणग्रंथातील एक उतारा उद्धृत केला आहे. (पृ. १५२) :-

"The principal design of a Grammar of any Language is to teach us to express ourselves with propriety in that Language, and to enable us to judge of every phrase and form of construction, whether it be right or not. The plain way of doing this is, to lay down rules, and to illustrate them by examples. But beside showing what is right, the matter may be further expalined by pointing out what is wrong."

(A Short Introduction to English Grammer by Robert Lowth, 1972, P. 97)

(श्री. दिवाकर मोहनी बाहू उंच उभारून हेच सांगू पाहात आहेत, पण त्यांचे कोणी ऐकायला तयार नाही; तेव्हा इंग्रज सोनाराकरवींच कान टोचलेले बरे अशा विचाराने मी हा प्रपंच केला !)

जुन्या काळीं 'विदर्भ संशोधन मंडळ वार्षिक १९७०' या अंकात (पृ. १२८) प्रा. म. दा. साठे यांनी 'संस्कृत भाषेच्या व्याकरणाचे ऐतिहासिक स्वरूप व प्रमाण ग्रंथ' या मथळ्याखाली एक लेख लिहिला होता. त्यात ते म्हणतात -

''व्याकरणाने भाषेचा प्रवाह थांबतो व तिला एका विशिष्ट चाकोरीतून जावे लागत असल्याने तिची वाढ खुंटते असा एक आक्षेप काही विद्वान् अलीकडे घेऊ लागले आहेत! पण त्यात अर्धसत्य आहे. भाषेचा नैसर्गिक प्रवाह कोणी थांबवू म्हटले तरी थांबत नाही व थांबणार नाही. तो अखंड चालूच राहणार ! पण तो प्रवाह चालू असता योग्य दिशेने जात आहे की नाही हे व्याकरण पाहते. नदीचा प्रवाह धरण बांधून थांबविता येतो हे खरे; पण तो कोणी कायमचा थांबवू शकत नाही. त्या प्रवाहाला विशिष्ट दिशेने पाट काढून वाट करून द्यावी लागते. त्यात चूक झाली तर तो प्रवाह बांध फोडून सैरावैरा धावू लागेल व अनिष्ट प्रसंग ओढवेल !''

१९६२ साली महाराष्ट्र सरकारने मराठी लेखनाचे हे शिस्तबद्ध गाडे (डें) डोंगरमाथ्यावरून ढकलून दिले आणि तेव्हापासून जी घसरण सुरू झाली ती आजतागायत

चालू राहिली व सोपेपणाला सवंगपणाची अवकळा आली. लेखन सोपे झाले, वाचन कठिण झाले ! परंतु सोपेपणाला, बेशिस्तीला, स्वैरपणाला सरावलेल्या पत्रकार मंडळींना शिस्तीच्या रुळावर आणणे खरोखर कठिण आहे व त्यांची तशी मानसिक तयारी नसणे हे अगदी स्वाभाविक आहे. मात्र स्वैरता हीच आजच्या जमान्याची स्वाभाविक प्रवृत्ती आहे असे म्हणून त्या अपप्रवृत्तीचे समर्थन करणे म्हणजे भ्रष्टाचार ही चालू जमान्याची सहजप्रवृत्ती असल्याने ती खपवून घ्यावी असे म्हणण्यासारखे आहे. सध्या बहुसंख्य विद्वान् असेच समर्थन करीत आहेत. त्याचप्रमाणे, काही मोजक्या संवेदनाक्षम लेखकांचा नवलेखनपद्धतीमुळे प्रथमप्रथम मानसिक कोंडमारा झाला आणि पत्रकार व प्रकाशक यांनी त्या लेखकांचे जुन्या वळणाचे शास्त्रपूत लेखन छापण्यास नकार देऊन त्यांची पुरती कोंडी केली. (मला स्वत:लाही हा लेख नवलेखनपद्धतीत लिहिणे भाग पडल्यामुळे माझीही तशीच कुचंबणा झाली आहे.) त्यामुळे तेही लेखक गेल्या कित्येक वर्षांपासून नवलेखनपद्धतीत रुळून गेले व या नवपद्धतीमुळे आपल्या अभिव्यक्तिक्षमतेवर काही मर्यादा पडताहेत याची बोचरी जाणीवही लोपली. वर्षानुवर्षे कैदेत काढल्यावर कैद्याला हातातल्या बेड्याही खुपेनाश्या होतात, संवेदना बोथट होतात, व पुढेपुढे त्या बेड्याच दागिन्यांसारख्या वाटूं लागतात हे खरें !

वस्तुतः, सामान्य माणसासाठी लेखनसरणीचे 'सोपीकरण' ही संकल्पनाच चुकीची आहे. कारण, कितीही सोपीकरण केले तरी, बहुसंख्य सामान्य माणसे अशुद्धच लिहितात व यापुढेही लिहिणार. शुद्धोच्चारण व शुद्धलेखन हे विषय त्या सामान्य माणसापुढे ज्यांचा आदर्श राहावा असे अपेक्षित असते तीं वृत्तपत्रादि प्रसारमाध्यमें, अभिजन साहित्यिक, शिक्षक-प्राध्यापक, इ. अल्पसंख्य व्यक्तींपुरतेच मर्यादित आहेत. कोणत्याही क्षेत्रातील आदर्श नेहमीच अल्पसंख्य असतात. (व्यवहारात सदाचारी व शिस्तशीर माणसांची संख्या अत्यल्प असते, आणि भ्रष्टाचारी व बेशिस्त व्यक्तींची नेहमीच बहुसंख्या असते, पण संस्कृतीच्या प्रांतात या बहुसंख्याकांना प्रतिष्ठा दिली जात नाही व द्यावयाची नसते आणि त्यामुळेच संस्कृती टिकून राहते.) पण १९६२ सालीं, बहुसंख्याकांचा अनुनय करण्यासाठी मराठीची लेखनसरणी ज्या धसमुसळेपणाने व कृत्रिमपणाने व्यापक प्रमाणावर बदलण्यात आली तिचे दुष्परिणाम तत्काळ जाणवले नाहीत, कारण तत्कालीन पिढी जुन्या-नव्या दोन्ही पद्धतींना साक्षीदार होती. पण आता ४० वर्षांनंतर जी नवीन पिढी उदयाला येत आहे तिला जुन्याची ओळख नाही. व्याकरण, व्युत्पत्ती, ऱ्हस्व-दीर्घ,

अनुस्वारविवेक या कशाचेही भान नसलेली ही पिढी प्रसारमाध्यमांतून जनतेसमोर येत आहे व जनतेसमोर तोच आदर्श (!) राहणार आहे. १९६२ साली कृत्रिमपणे घडवून आणलेल्या स्थित्यंतरामुळे, मराठीतील जवळजवळ प्रत्येक शब्द दीर्घान्त झाला. या अतिरेकी दीर्घीकरणामुळे, पत्रकारांचे इतर भाषांविषयींचे भान हरवले ते इतके की, ते आता 'शुभं करोती' , 'नेती नेती' आणि 'कौन बनेगा करोडपती ?' असे लिहितात. अनुच्चारित अनुस्वार गाळल्यामुळे, नपुंसकलिंगी एकवचनाची व अनेकवचनाची खूण हरवली. परिणामत:, 'त्यांचे धाबे दणाणले आहेत' ('धाबे' हें नुपं. एकवचन की 'धाबा' याचें अनेकवचन ?) असे व्याकरणदुष्ट शब्दप्रयोग छापून येऊ लागले. संस्कृत तत्सम हलन्त शब्द (उदा. गुणवान् / मान्) पायमोडीने लिहू नयेत असे फर्मान निघाल्यामुळे 'गुणमानतेचा ऱ्हास' अशासारखे अशुद्ध शब्दप्रयोग डोळ्यांसमोर येऊ लागले आहेत. केशवसुतपूर्व व चिपळूणकरपूर्व काळातील गद्य व पद्य यथामूल छापावे असा सरकारमान्य नियम (१५) असूनही हाताला नवीन वळण लागल्यामुळे, नवे पत्रकार व नवे-जुने साहित्यिकदेखील जुनें संतवाङ्मयही नवीन वळणाने छापतात, पण त्यामुळे त्यांतला अर्थच हरवून बसतो याचेही त्यांना भान राहात नाही.

(उदा. बोली (लीं) अरूपाचे रूप दावीन)

१५ व्या नियमानुसार, केशवसुतांची कविता नवीन निरनुस्वार पद्धतीने छापली, उदा.

'आई ग! तर वद माते (तें)
कोठुनि हे आले येथे ?' ('थेंब दंवाचे')

तर तिची काय वासलात लागेल हे विद्वानांना मी सांगावयास हवें काय ? लेखन-मुद्रण सुकर करण्यासाठी नियम सोपे करावेत हा सरकारपक्षाचा दावा (शुद्धलेखननियमावली (उपोद्घात) - पुनर्मुद्रण १९९६ ; प्रकाशक-भाषा संचालनालय) मान्य करावयाचा झाला तर, सोपीकरणाला अजूनही खूप वाव आहे. मुळात, मराठी समाजाची एक घोड चूक झाली ती अशी की, सरकारी कारभार मराठीतून करताना, तो जलद होण्यासाठी सरकारी पत्रव्यवहाराला शुद्धलेखनाचे काटेकोर नियम लावू नयेत, तेथे सवलत द्यावी असे म्हणण्याऐवजीं, सरकारी कारभाराच्या सोयीसाठी शुद्धलेखनाचे सर्वच क्षेत्रांतील आदर्श व मानदंड ढिले करण्यात आले व बिनसरकारी साहित्य, शिक्षण-क्षेत्र यांच्यांतही सरकारी हस्तक्षेप कायम ठेवायचे असतात, मात्र त्यांची अंमलबजावणी करताना काही क्षेत्रांपुरती थोडी सूट दिली तर चालते. उदा. भाषा-विषय सोडून इतर

विषयांच्या पाठ्यपुस्तकांत शुद्धलेखनाची गरज नाही असे म्हणण्याऐवजी, सर्व विषयांच्या पाठ्यपुस्तकांत शुद्धलेखन असलेच पाहिजे, मात्र भाषा-विषय सोडून इतर विषयांच्या उत्तरपत्रिकांमध्ये विद्यार्थ्यांच्या अशुद्धलेखनाकडे दुर्लक्ष करावे व त्याबद्दल त्याचे गुण कापूं नयेत असे म्हणणे अधिक संयुक्तिक ठरते.

मराठी लेखनाची सद्य:स्थिती चिंताजनक आहे असे डॉ. द. न. गोखले यांना जाणवलेले दिसत नाहीं, पण डॉ. आचार्य मात्र मराठी भाषेच्या आरोग्याविषयीं सचिंत दिसतात. सध्याच्या दुरवस्थेसंबंधी मी केलेले निदान डॉ. आचार्यांच्या मतें चुकीचें असेल आणि डॉ. आचार्यांना खरोखरी तशी चिंता वाटत असेल तर , त्यांनी त्याविषयीं सखोल चिंतन करून, या रोगाचे नेमके निदान करावे आणि इलाजही शोधून काढावा असे माझे त्यांना आवाहन आहे. सेवेशी श्रुत होय ही विज्ञापना.

गेली चाळीस वर्षें मराठी साहित्यिकांनी ज्या शिस्तीचे पालन केले ती खरे पाहतां, एकमेकांच्या खांद्यांवर हात ठेवून चालणाऱ्या आंधळ्यांच्या माळेची शिस्त होती. पण आता मराठी लेखनाच्या 'दूरावस्थे' ची जाणीव झाल्यावरही, अर्थाचा अनर्थ वा विपर्यास झाला तरी, त्याकडे ('गुंततां हृदय हें कमलदलाच्या पाशी की पाशीं' हाही विवेक न करता) डोळेझाक करून आमचे विद्वान् सध्याच्या (अ) शुद्धलेखनपद्धतीवर ठाम राहणार असतील तर, अंधपरंपरान्यायाने पुढे कोणत्यातरी दरीत आपल्या भाषेचा जो अध:पात ठरलेला आहे त्याविषयीं ते उदासीन आहेत असे म्हणावें लागेल. म्हणून औद्धत्याचा दोष पत्करूनही मला असे म्हणावेसे वाटते की, एकवेळ झोपी गेलेल्या माणसाला जागें करता येईल, पण झोपेचे सोंग घेतलेल्यांना मात्र जागें करणे कठिण !

□□□

**१६, यशोदाकुंज सोसायटी, सी.टी.एस. ३३२, तेजसनगर, कोथरूड,**
**पुणे - ४११ ०२९. दूरध्वनि : ५३८ ३७५५**





अनुक्रमणिका

# संगणकासाठी मराठी - काळाची गरज

शुभांगी रानडे

महाराष्ट्रात पहिलीपासून इंग्रजीचे शिक्षण देण्यास सुरुवात झाली आहे. माहिती तंत्रज्ञानाच्या प्रसारामुळे सारे जग एक झाले आहे. या स्पर्धेच्या युगात मराठी माणूस मागे पडू नये व नव्या आव्हानांना सामोरे जाणे नव्या पिढीला शक्य व्हावे या दृष्टीने सरकारने हा धाडसी निर्णय घेतला आहे. मुले नवी भाषा लगेच सहजपणे शिकू शकतात व लहानपणी शिकलेले चांगले लक्षात राहते या गोष्टींचा विचार करता हा निर्णय योग्य आहे असे वाटते. कदाचित चौथीनंतर बरीच मुले शाळा सोडतात त्यासाठी त्यांनाही इंग्रजीची तोंडओळख असावी अशीही त्यामागे कल्पना असावी. यावेळी हे लक्षात घ्यावयास हवे की या धोरणाचा दृश्य परिणाम दिसायला किमान पाच वर्षे वाट पाहावी लागणार आहे. तसेच याचा आपल्या सांस्कृतिक जीवनावर विपरीत परिणाम होणार नाही याची काळजी घेणे जरूर आहे. गरीब शेतमजूर, झोपडपट्टीत हलाखीत जीवन कंठणारे लोक, आपली मुले आपल्याला पप्पा, मम्मी म्हणतात आणि इंग्रजी गाणी गातात म्हणून निश्चितच खूश होतील. पण मुलेच मानसिकदृष्टया त्यांचेपासून व इंग्रजी न जाणणाऱ्या इतर बालमित्रांपासून मानसिकदृष्ट्या दूर होण्याची भीती आहे.

आपण याआधीच परिसरविज्ञानासारख्या आवश्यक विषयांचा अभ्यासक्रमात समावेश केला आहे. मुलांवर अभ्यासाचा जास्त बोजा पडला तर त्याचाही दुष्परिणाम होण्याची शक्यता आहे. इंग्रजी शिक्षणाकडे जास्त लक्ष दिल्यास मुलांचे मराठी कच्चे राहण्याचा धोका जास्त जाणवतो. इंग्रजी माध्यमात शिकणाऱ्या मुलांना इतर विषय चटकन समजत नाहीत व ती मुले बऱ्याच वेळा सामान्य ज्ञानात मागे पडतात, असा अनुभव आहे. पुष्कळदा महत्त्वाकांक्षी गरीब पालक आपल्या पोटाला चिमटा काढून मुलांना इंग्रजी शाळेत घालतात. मात्र सधन व सुशिक्षित पालकांसारख्या सुविधा व लक्ष देऊ न शकल्याने त्यांच्या पदरी निराशा येते व मुलांनाही ते न पेलवणारे ओझे ठरते.

त्यामुळे इंग्रजीच्या हव्यासापायी मराठीकडे दुर्लक्ष करून चालणार नाही. लोकांची बोली व्यवहाराची भाषा मराठीच राहणार असल्याने मराठी अधिक समृद्ध व सर्वसमावेशक करण्याची खरी गरज आहे. समाजाची इंग्रजीबाबत असणारी उदासीनता हे मागासलेपणाचे लक्षण न मानता त्यात व्यावहारिक अडचण आहे हे समजून घेतले





अनुक्रमणिका

पाहिजे. परक्या भाषेत शिक्षण घेणे विद्यार्थ्यांना शक्य असले तरी सर्वसामान्य माणसास तशी इच्छा, सवड व क्षमताही नसते. त्यामुळे मातृभाषेत उपलब्ध असणाऱ्या ज्ञानावरच तो आपले काम भागवतो.

याउलट संगणक क्रांतीकडे पाठ फिरवूनही चालणार नाही. संगणकाचे फायदे त्वरित मिळण्यासाठी तातडीने उपाय करणे आवश्यक आहे यात शंका नाही. यासाठी इंग्रजी भाषेतील ज्ञान मराठीत आणण्याचा प्रयत्न संगणक तज्ज्ञांनी करावयास हवा. सध्या संगणक क्षेत्रात समाजातील उच्चशिक्षित बुद्धिमान वर्ग मोठ्या प्रमाणावर उपलब्ध आहे. त्यांना मराठीसाठी नव्या संगणकप्रणाली विकसित करणे सहज शक्य आहे. मात्र मराठीबाबत त्यांचा दृष्टिकोन सहसा नकारात्मक असतो. मराठीतून काम करणे म्हणजे कमीपणाचे अशी त्यांची समजूत असते. मात्र आजच्या काळाची ती गरज आहे हे त्यांनी ओळखले पाहिजे. सध्या संगणक शिक्षणाचे सगळीकडे पेव फुटले आहे. गल्लोगल्ली निघालेल्या अशा शिक्षणसंस्थांत लाखो मुले नोकरी मिळेल या आशेने महागडी फी भरून शिक्षण घेत आहेत. मात्र या सर्वांना देण्यासाठी आपल्याकडे नोकऱ्या नाहीत. परदेशातही फारच थोडी मुले जाऊ शकतात. नोकऱ्या देऊ शकणारे स्वदेशी उद्योग परदेशी मालाच्या आक्रमणाने याआधीच आर्थिक मंदीत आहेत. अशा वेळी मराठीतून संगणकप्रणाली विकसित करण्याचा व्यवसाय ही स्वयंरोजगार निर्मितीसाठी एक उत्कृष्ट संधी आहे आणि त्याचा फायदा घेऊन व्यवसायाबरोबरच आपल्या समाजाचा नव्या तंत्रज्ञानाच्या साहाय्याने विकास केला पाहिजे. देशातील उद्योगधंद्यांसाठीही हे एक वरदानच ठरेल यात शंका नाही.

रशिया, जपान, चीन, जर्मनी यांसारख्या देशांनी आपल्या मातृभाषेस सर्वाधिक महत्त्व दिले व जगातील ज्ञानाचे त्यांच्या भाषेत रूपांतर करून त्यांनी नवा जागृत समाज निर्माण केला. तेथील लोकांना इंग्रजी भाषा आता आवश्यक भाषा वाटत नाही. उलटपक्षी इंग्लंड-अमेरिकेसारख्या देशांतील संगणकतज्ज्ञांना त्यांच्या संगणकप्रणाली त्या भाषांमध्ये रूपांतरित करण्याची गरज भासू लागली आहे. आता परदेशी कंपन्या भारताकडे एक मोठी ग्राहक बाजारपेठ या स्वरूपात पाहात आहेत. तेथे निर्माण होणाऱ्या वस्तू भारतात विकण्यासाठी इंटरनेटने त्यांना चांगली संधी उपलब्ध करून दिली आहे. येथील उद्योगधंद्यावर त्याचा विपरीत परिणाम होणार आहे. त्यांच्या साधनसंपत्ती व जाहिराबाजीच्या जोरावर ग्राहकांची मानसिकताच बदलण्याचा ते प्रयत्न करीत आहेत. स्वदेशीचे पुरस्कर्ते या लाटेला थोपवू शकणार नाहीत. परिणामी येथील उद्योगधंद्यांचे

अपरिमित नुकसान होईल व देश आर्थिक गुलामगिरीत जाईल. माहिती तंत्रज्ञानाचे आक्रमण परतवून लावणे लढाईत विजय मिळविण्यापेक्षा अधिक अवघड आहे हे आपण वेळीच ओळखले पाहिजे. यात आपण मागे पडलो तर इतिहास आपल्याला क्षमा करणार नाही. ब्रिटिशांनी जसे इंग्रजी कारकून तयार करून आपल्यावर राज्य केले तसे नवे संगणक तज्ज्ञ आपल्याला महागात पडतील. संगणक शिक्षणाचा एवढा प्रसार होणे व पहिलीपासून इंग्रजी शिकवणे यामागे अशा परदेशी कंपन्यांचाच जास्त फायदा होणार आहे. साऱ्या जगाची बाजारपेठ आपल्याला खुली होऊन आपल्या उद्योगधंद्यांची भरभराट होईल या कल्पनेत मशगुल न राहता आपण आपले येथील ग्राहक आपल्याकडेच कसे राहतील याचा गांभीर्याने विचार करावयास हवा. कारण आपले उद्योग जगले व समर्थ झाले तरच आपल्याला परदेशी बाजारपेठेत शिरकाव करता येईल. यासाठी परदेशी कंपन्यांनी आपले हातपाय पसरायच्या आत आपल्या देशातील वस्तू इंटरनेटद्वारे मराठीतून आपण ग्राहकांपर्यंत पोचवावयास हव्यात. त्यासाठी त्वरित व जोमाने प्रयत्न व्हावयास हवेत.

मात्र यावेळी एक उपयुक्त संपर्क माध्यम म्हणून आपण मराठीकडे पाहिले पाहिजे. अनेक इंग्रजी शब्दांना मराठीने आधीच आत्मसात केले आहेत. नव्या इंग्रजी शब्दांचा आवश्यक तेथे वापर करून मराठी अधिक समृद्ध केली पाहिजे. शब्द आणि भाषा यातील भेद लक्षात घ्यावयास हवा. केवळ शुद्ध मराठी शब्द वापरून अनुवादित केलेली पुस्तके दुर्बोध असल्याने वाचली व वापरली जात नाहीत. याउलट इंग्रजी शब्द वापरूनही मराठीत शिकविले तर एरवी इंग्रजी जाणणाऱ्या कॉलेज विद्यार्थ्यांनाही विषय चटकन समजतो असा अनुभव आहे. लोकांपर्यंत तुम्हाला माहिती पोचवायची असेल तर त्यांना रुचेल व पचेल अशा भाषेचाच वापर करावयास हवा.

वेबपेजच्या भाषेत सांगायचे तर सर्वांना इंग्रजी शिकविणे म्हणजे क्लायंटसाईड प्रोग्रॅम करून तेथील क्षमतेचा वापर करणे आणि संगणकावर मराठीत प्रोग्रॅम करणे म्हणजे सर्व्हरसाईड प्रोग्रॅम करणे होय. सर्व्हरसाईड प्रोग्रॅम अधिक उपयुक्त ठरतो कारण त्याला ग्राहकाच्या क्षमतेवर अवलंबून राहावे लागत नाही. यामुळे सर्वांना इंग्रजी शिकविण्यापेक्षा संगणकाला मराठी शिकविणे अधिक श्रेयस्कर व प्रभावी ठरेल. महंमद पर्वताकडे गेला नाही तर पर्वताने महंमदाकडे जावयास हवे असे म्हटले जाते. येथे सारा समाज महंमद आहे व त्याला पर्वताकडे जाण्यास उद्युक्त व सक्षम करणे अवघड आहे. गरज कोणाला आहे याचा विचार करावयास हवा. आज सर्वांना ग्राहकांपर्यंत इंटरनेटद्वारे पोचायचे आहे. ग्राहक इंग्रजी शिकून त्यांचा माल खरेदी करण्यासाठी त्यांचेकडे जातील अशी अपेक्षा बाळगणे चुकीचे आहे. आता राहता राहिली समाजाच्या प्रगतीची गरज. तीदेखील

इंग्रजीची पूर्वअट घालून कदापि यशस्वी होणार नाही.

दुर्दैवाने मराठीतून संगणकप्रणाली विकसित करण्यासाठी विशेष प्रयत्न होताना दिसत नाहीत. औरंगाबादहून माहिती महामार्ग विविधा या नावाचे संगणक शिक्षणावर आधारलेले मराठी मासिक सुरू झाले आहे. सुयश कॉम्प्युटर्स, पुणे यांनी संगणक विषयावर मराठीतून सुंदर सोपी पुस्तके काढली आहेत. मात्र त्यांचा उद्देश लोकांपर्यंत संगणक नेणे हा आहे. सी डॅक, पुणे यांनी जिस्ट, लीप, लीप ऑफिस २००० यासारखी भारतीय भाषांमध्ये संगणकप्रणाली विकसित करण्यासाठी उपयुक्त उत्पादने काढली आहेत. मोड्युलर सिस्टीम्स, पुणे यांनी प्रकाशन व्यवसायासाठी श्री लिपी, अंकुर सारख्या भारतीय लिपी विकसित केल्या आहेत. मात्र त्यांचा वापर करणाऱ्या संगणकतज्ज्ञांची संख्या फारच नगण्य आहे. याचे एक कारण म्हणजे या उत्पादनांचा वापर करून इंग्रजीतील परदेशी प्रोग्रॅमिंग भाषा सहजपणे वापरता येत नाहीत. इंग्रजी अक्षरांवर आधारित अशा शिवाजी, कृष्णा, अजय यासारख्या किंवा इ-पत्र सारख्या शब्दउच्चारावर आधारित लिपी बऱ्याच लोकांनी तयार केल्या आहेत. तरीदेखील त्यात फार सुधारणा होण्याची व वर्णमालेप्रमाणे शब्दांचा क्रम लावणे तसेच शब्दकोश आणि वाक्यसंगती तपासण्यासाठी योग्य प्रोग्रॅम तयार करण्याची आवश्यकता आहे. सरकारने व व्यावसायिकांनी अशा प्रयत्नांस प्रोत्साहन आणि आर्थिक मदत करण्याची आवश्यकता आहे. तरच या प्रक्रियेस वेग येऊ शकेल.

या विचाराचा पाठपुरावा आणि प्रसार करण्यासाठी आम्ही

http : //education.vsnl.com/dnyandeep

या नावाचे एक होम पेज इंटरनेटवर सुरू केले आहे. आपण ते पाहून आपल्या सूचना व मते आपण खालील पत्त्यावर कळविल्यास आम्ही त्यास आमच्या होम पेजमध्ये प्रसिद्धी देऊ.

काही तरुण इंजिनिअर्सनी एकत्र येऊन मराठीतून वेब पेज आणि संगणक प्रणाली विकसित करण्यासाठी ज्ञानदीप, सांगली या नावाची संस्था स्थापन केली आहे. आपण या संधीचा अवश्य फायदा घ्यावा अशी नम्र विनंती.

□□□

**द्वारा : डॉ. सु. वि. रानडे**

**'ज्ञानदीप' शिल्पचिंतामणी सोसायटी, पो. वानलेसवाडी,**

**सांगली - ४१६ ४१४. दूरध्वनी : ३०० ३८१**

ज्याची त्याची प्रचीती

# भाषावधान

सुप्रिया सहस्रबुद्धे

एका शिक्षिकेची अशी कथा ऐकली होती की आपल्या प्रियकराने लिहिलेल्या प्रेमपत्राचे शुद्धलेखन तिने दुरुस्त केले. हे जरा अतीच झाले. प्रेम शुद्ध असेल तर प्रेमपत्रातले अशुद्ध लेखन खटकायचे कारण नाही. पण एकंदर व्यवहारात भाषा शुद्ध रीतीनेच वापरायला हवी. चुकीची शब्दरचना भातातल्या खड्यांसारखी टोचते नव्हे , टोचायलाच हवी त्यात काय बिघडंल- असा दृष्टिकोण घेतला तर भाषिक व्यवहारात गोंधळच माजेल. इंग्रजी आणि हिंदी भाषांमधले शब्द गरज नसताना मराठीत घुसडून बेंगरूळ भाषा बोलण्याची एक नवीनच रीत हल्ली पाहायला मिळते. ''किती 'वेट' करत होते मी'' अशासारखी वाक्ये ऐकली की माझी चिडचिड होते व आपली ही असहनशीलता आगाऊपणाची आहे की काय असेही वाटायला लागते.

पण संस्कृतमधले दोन श्लोक परवा वाचनात आले, तेव्हा समाधान वाटले की असले असहनशील आपण एकटेच नाही आहोत.

एकाने दुसऱ्याला म्हटले - 'शीतं बहु बाधति' (थंडीचा फार त्रास होतो आहे.) आता बाध् हे क्रियापद आत्मनेपदी असल्यामुळे बांधते असे म्हणायला हवे. त्यामुळे ऐकणारा म्हणाला-

''न तथा बाधते शीतं यथा 'बाधति' बाधते ।'' (बाधति या अशुद्ध रूपाचा जेवढा त्रास होतो आहे, तेवढा थंडीचा त्रास होत नाही आहे.)

हे तर काहीच नाही. दुसऱ्या एका संस्कृत सुभाषितातील भाषावधानी कन्येने भाषिक बाधेमुळे पाहायला आलेल्या मुलाला नाकारले. तिने त्याला विचारले - 'विहस्य' व 'विहाय' ही कसली रूपे आहेत?''

संस्कृतमधील बऱ्याच नामांची स्य लागून षष्ठी होते व अय लागून चतुर्थी होते. त्यामुळे त्या उपवधू तरूणाने सांगितले,

''विहस्य ही षष्ठी व विहाय ही चतुर्थी आहे.'' प्रत्यक्षात 'विहस्य' हे वि+हस् या धातूचे ल्यबन्त अव्यय व 'विहाय' हे वि+हा या धातूचे ल्यबन्त अव्यय आहे. त्यामुळे त्या कन्येने त्याला उत्तर दिले- ''ज्याची 'विहस्य' ही षष्ठी व 'विहाय' ही चतुर्थी आहे, त्याची द्वितीया (पत्नी) मी कशी होऊ ?''

भाषेबद्दलची अशी संवेदनशीलता जर सर्वत्र निर्माण झाली तर किती बरे होईल!

□□□

१०३ विक्रम हाइट्स, राहुलनगरसमोर, कोथरूड, पुणे-२९





अनुक्रमणिका

# भाषा

सितांशु यशश्चंद्र

[ सितांशु यशश्चंद्र (जन्म १९४१) हे गुजरातीमधील एक महत्त्वाचे कवी. आणि समीक्षक. 'ओडिस्यूस-नु हलेसु' १९४७, 'जटायु' १९८६ हे कवितासंग्रह. 'सीमांकन अने सीमोल्लंघन' १९७७, 'रमणीयतानो वाग्विकल्प' १९७८ हे समीक्षासंग्रह त्यांच्या नावावर आहेत. 'भाषा' ही कविता 'जटायु' मधून घेतलेली आहे, या संग्रहाला साहित्य अकादेमीचे पारितोषिक मिळालेले आहे. इंडियाना विद्यापीठातून तौलनिक साहित्याभ्यास या विषयात पीएच. डी. मिळाली आहे. सध्या ते बडोद्याच्या महाराजा सयाजीराव विद्यापीठात प्राध्यापक आहेत.

***कवितेचा मूळ गुजरातीवरून*** *अनुवाद पद्मा मेहता यांनी केला आहे.* यांनी जरुरीपुरत्या संदर्भटीपाही शेवटी दिलेल्या आहेत. कवितेचा रचनाकाल १९७९.]

मला तर आवडली आहे ही आपली गुजराती भाषा.

सुखदु:खाच्या गोष्टी करताना, शाळेत एडमिसनचा सवाल,
मंगल महूडीहून गोधरा गावी जाणाऱ्या
एश्टीचा टैम, विटामीन अन प्रजीवकं, आपल्या
जीबोदाणंदो दाशच्या बोनोलोता[१] काव्याचं सौंदर्य,
मंत्रीमहोदय आणि अर्ज, बबनच्या ल्योकीची
हरताळका आणि आय लव्ह यू सुरेखा, खरंच - इथपर्यंत

आणि याहूनही खूप सुंदर सुरावटीत हिचं संगीत ऐकलं आहे मी.

एकदा 'पूर्वालाप'[२] घेऊन बसलो होतो. कान्त[३] प्रिय कवी.
वाटलं की आज तर आख्खी दुपार वाचतच बसावं
खंडकाव्यं, कव्वाल्या, अंजनी गीतं, लिरिक्स, व्हॉट नॉट?
'आकाशे एनी अे तारा'[४] वाचलं आणि नंतर, पहा बरं,

कविवर कान्तची पण कशी फिरकी घेते
आपली खोडकर गुजराती भाषा.
भगवंतांच्या असीम कृपेमुळे गद्गद् होऊन कवीश्री त्यांचे
आभार व्यक्त करू पाहत होते; पण बोलून गेले इन्स्टेड की-
आपण मला ओले चिंब केले हो तातजी !
आपण मला पार बुडवले.[५]

झालं.
'पूर्वालाप' चं आपलं वाचन संपलं अन
आतून बेंबीपासून हास्याचे बुडबुडे फुटतच राहिले
राहून राहून

मला तर आवडली आहे ही आपली भाषा,
जी तिच्या लाडक्यात लाडक्या लेकाची देखील
मस्करी करून घेते.
कोण बरं असेल तिचं सर्वात लाडकं मूल ?
-एखादी मूक मुलगी सोळा वर्षाची ?
तिच्या जवळ बसून, मुकी मुकीच, एखाद्या
एकान्त सायंकाळी, तिचे केस गोंजारत असेल,
ही गुजराती भाषा

तिचं वात्सल्य हवं असेल तर मुके व्हा

कसा जन्म झाला असेल बरं तिचा ?

वायसु उड्डावन्तियअे पिऊ दिट्ठ्उ सहसत्ति ....[६]
- पण नंतर ?
भल्ला हुआ जु मारिआ, बहिणि मारा कन्तु[७]
- बिन बापाचीच जन्मली?

पण ही तर अनादी.

उल्हास आणि विषाद
यां गोष्टी सुखाच्या व दुःखाच्या,
अनादी.
अनादी तशी ही पण - गुजराती भाषा, भाषा मात्र.

एक अखंड प्रवाह, अमृताचा,
मदांकिनी म्हणा, गंगा म्हणा, हुगळी ही म्हणा
मनात आलं तर म्हणा सागर

अनंत पण ती - गुजराती भाषा. फक्त भाषा.

अनादी, अखंड, अनंत सुखदुःखाच्या गोष्टी
सायंकाळी कट्ट्यावर बसून किंवा रेस्टॉरंट मध्ये,
करतो एकमेकांशी आपण
भाषा - जितकं सांगते तितकंच लपवते.
लपवते लपवते नी मध्येच सहज सुचवते एखाद्या इशाऱ्यानं....

माउलीच्या डोळ्यांतून, बापाच्या बोलण्याच्या लकबीतून....
धाटणी म्हणजेच तर भाषा.
एकेका शब्दोच्चारातून सबंध माणूस.

''गर्भात असलेल्या बाळाचे डोळे आईच्या चेहऱ्यावर चमकतात''[८]
तसं पाहिलंय कधी तुम्ही डोकावताना एखाद्याचं
संपूर्ण अस्तित्व, अर्ध्यामुर्ध्या शब्दोच्चारातून त्याच्या ?

अवघड आहे तो उच्चार ऐकण्याचा क्षण
- ताकद पाहिजे, हवी माणुसकी आयुष्यभराची.

भाषा माणसातली माणुसकी आहे.

पशु बोलू शकत नाहीत, सार्थ शब्द फक्त माणूसच
उच्चारू शकतो असे भाषाशास्त्रज्ञ म्हणतात,
पण ती ही गोष्ट नव्हे,
भाषा बोलंण यात माणुसकी असेल ही,
परंतु खरी माणुसकी आहे बोललेलं ऐकण्यात
- आणि न बोललेलं पण

कितीतरी साठलंय ना बोललेलं तुझ्या मनात,
माझ्या भावा, माझ्या बहिणी,
मला माहित आहे.

तुझ्यावतीनं बोलण्याचा ठेका घेतलेले 'कवी' तर वेगळेच
निमूट ऐकतोय मी तर तुझे न बोललेले बोल.
मला आदर वाटतो तुझ्या मूकपणाचा,
आणि स्नेह तुझ्या माणुसकी बद्दल
खरा माणूस
कुत्री, मांजरं, गायी, घोडे अन झाडपानांप्रमाणे
भाषा ऐकू शकणारा प्राणी आहे.

आणि मूक राहू शकणारा.

कसं बरं संगोपन झालं असेल या गुजराती भाषेचं ?

कैदेत गेली असेल नरसिंहाचे बोट धरून [१]
त्या काळ्या कोठडीत गिरवला गेला असेलं तिचा 'क'
आणि मग, दुसऱ्या दिवशी,
देवाच्या कंठातून माणसाच्या गळ्यात तिनं
स्थलांतर केलं असेल.
सोन्याच्या हाराचं रूप घेतलं तिनं,
गळ्याच्या बाहेरील भागासाठी,





अनुक्रमणिका

पण ते तर मिथक

- घडलं सारं आंतच.

नंतर
हळू हळू
हळू हळू
हार परत पुतळ्याच्या माने वर गेला.

डोळे बारीक करून बघतो.
कान टवकारून ऐकतो.
पण माणसाचा कंठ नि:शब्द आहे,
माणसाचा आवाज गप्प आहे.

अहो कोण बोलतंय ही गुजराती भाषा ?
प्रिंटिंग मशीनं ? यांत्रिकपणे थरथरणारे रेडियोचे व्हाल्व्ह?
टेलिव्हिजनच्या ठिपक्यातून साकारणे चेहरे -
जे माझ्या अगदी समोर आहेत
आणि उघड्या डोळ्यांनी दिसतही नाही मी त्यांना ?
त्यांच्या नजरे समोर माझा हार्टफेल झाला
तरी 'अरे' एवढं देखील बोलणार नाहीत ते,
करत राहतील साहित्यिक चर्चा,
एखादे नाटक, किंवा कविता.

अहो कोण बोलतय आज ही गुजराती भाषा?

हृदय बंद पडलंय.
मशीन चालू झालंय,
हार पुन्हा त्या पुतळ्याच्या मानेवर जाऊन पडलाय
शिवाय नवीन आलेल्या सुलतानाची[१०] भयावह आणि
वाइट नजर पण गेली आहे त्याच्या वर.

माझ्या श्रीमंत पाटलाच्या पोरी !
माझी ताई, माझी माई ! भासा गुजराती !
बाण लागून जशी गाय व्याकूळ हंबरते
तशी हंबरत आहेस तू.

जखम फार दु:खते कां ग ?
खोलवर घुसलाय का तो विषारी बाण ?
दम, थोडा धीर धर माये. हा आलाच,
आला तुझा तारणहार कवी, माणूस.

प्रिंटिंग मशीनं माणसाला जाती बाहेर काढतील
काढू देत : बोल,

माणसा ! माणसा ! बोल
पुन्हा गुजराती भाषा बोल,
पुन्हा पुन्हा गुजराती भाषा बोल.
बोल माणसा, माणसाची भाषा बोल.

**संदर्भ टिपा**

१) बंगाली कवी जीवनानंद दास यांच्या 'वनलता सेन' या काव्यसंग्रहाच्या भोळाभाई पटेल यांनी केलेल्या गुजराती अनुवादाचा हा उल्लेख. या संग्रहात प्रत्येक डाव्या पानावर गुजराती लिपीत मूळ बंगाली काव्य आणि उजव्या पानावर त्याचा गुजराती अनुवाद आहे.

अनेक प्रथितयश गुजराती साहित्यिकांचे बंगाली भाषेवरील प्रभुत्व उल्लेखनीय आहे. बंगाली भाषेतील उत्कृष्ट साहित्यकृतींचे सुंदर अनुवाद गुजरातीमध्ये नेहमीच होत असतात. इतर भाषेतील 'वेगळेपण' सामावून घेऊन तिला 'आपली' करणाऱ्या गुजराती भाषेच्या ताकदीचा सूर या ओळीत सापडतो.

२) कवी कान्त यांचा गाजलेला काव्यसंग्रह

३) कान्त - मूळ नांव : मणिशंकर भट्ट (१८६८ - १९२३)

४) कान्त यांच्या 'विप्रयोग' काव्याची पहिली ओळ.

५) गुजराती भाषेतील 'न्हवराव्यो' (न्हाउ घातले) या क्रियापदावर मूळ कवितेत श्लेष आहे. 'स्नान घालणे' आणि 'बुडवणे' ('लुबाडणे' या अर्थाने) असे त्याचे दोन अर्थ होऊ शकतात. मूळ कवितेत दोन्ही ओळीत 'न्हवराव्यो' शब्द आहे. मराठी भाषांतरामध्ये हा आशय आणण्यासाठी दोन वेगळे शब्द वापरले आहेत.

६) १२ व्या शतकात जैन मुनी हेमचंद्राचार्य सूरींनी अपभ्रंश व्याकरणावर 'सिद्धहैम' पुस्तक लिहिले. गुजराती भाषेच्या विकासातला हा पहिला टप्पा-प्राचीन गुजरातीच्याही पलीकडे. या पुस्तकातील २ मुक्तकांचा येथे उल्लेख आहे. कवितेत दोन्ही मुक्तकांच्या फक्त पहिल्या ओळीच घेतल्या आहेत.

कावळे उडवत असताना अचानच तिनं प्रियतमाला येताना बघितले म पुढची ओळ : (विरहकृश हातांवरून) अर्ध्या बांगड्या जमिनीवर पडल्या आणि अर्ध्या (प्रियदर्शनाने फुलल्यामुळे) पिचकून तुटल्या.स

७) बरं झालं बहीण की माझे स्वामी धाराशयी झाले. (पुढची ओळ: पळून घरी आले असते तर सख्यांपुढे मला किती लाजिरवाणे व्हावे लागले असते ).

८) विख्यात गुजराथी कवी उमाशंकर जोशी (१९११-१९८८) यांच्या 'सप्तपदी' कवितासंग्रहातील कविता 'शोध' (रचना १९५९) मधल्या मूळ ओळी अशा 'गर्भाशयातल्या बाळाचे मिटलेले डोळे। आईच्या चेहऱ्यात चमकतात। माझ्या अस्तित्वात हे काव्य प्रकाशमान झालेलं तुला। जाणवतं का ?' या ओळी प्रसिद्ध आहेत.

९) गुजराती भाषेचे अद्यकवी संत नरसिंह महेता (१५ वे शतक). गुजरातच्या कट्टर सनातनी नागर जातीत जन्माला आलेला हा संतकवी साधुसंत व दलितांबरोबर कीर्तन करायचा. संसार- व्यवहाराकडे पूर्ण दुर्लक्ष ! समाज त्याची टिंगल करायचा. दारिद्र्यामुळे त्यांच्या कुटुंबाचे अतोनात हाल झाले. त्यातच पत्नीचा देहांत झाला. तरुण मुलगा आणि जावई यांनाही काळाने हिरावून घेतले. घरात राहिल्या दोन तरुण विधवा ! परंतु अशा कठीण परिस्थितीत देखील त्याने कृष्णभक्ती आणि कविता सोडली नाही. त्याच्या कवितेत भक्ती व तत्त्वज्ञानचा समन्वय आढळतो.

१०) नवीन आलेला हा सुलतान म्हणजे इंग्रजी भाषेचा पाठता प्रभाव- दुसरी गुलामी- असा अर्थ येथे घेता येईल. मातृभाषेच्या संगोपनाकडे दुर्लक्ष आणि इंग्रजी माध्यमाच्या शाळांचे वेड या दोन्हींमुळे मातृभाषेचे अस्तित्वच धोक्यात आले आहे.

**अनुवादिकेचे मनोगत**

भाषा आणि जीवन यांचा घनिष्ठ संबंध या अनेक पदरी कवितेतून व्यक्त होतो. जीवनासाठी भाषा आहे, माणसांसाठी आहे, भाषेसाठी माणूस नव्हे. शिवाय कोणती मराठी वा कोणाची गुजराती प्रमाणभूत आणि 'शुद्ध' मानायची? 'लेक' कां 'ल्योक? 'टैम' आणि 'एडमिसन' का 'टाइम' आणि 'ॲडमिशन'? 'भाषा' का 'भासा'? समाजाच्या वेगवेगळ्या स्तरांवर वावरणाऱ्या माणसांनी एकमेकांशी संवाद साधण्यासाठी, परिस्थिती प्रमाणे किंवा कुवती प्रमाणे भाषेला मुरड घातली, सोईस्कर बदल केले. पण 'लेक', 'कन्या' व 'ल्योक' ही एकाच भाषेची विविध रूपे नव्हेत का? उल्हास, विषाद आणि या दोन्हीच्या मध्ये असलेले अनेक भावरूप झेलते ती भाषा; अनादी व अनंत, सुखदु:खासारखी.

तर असा या कवितेत प्रमाणभूत 'शुद्ध' भाषेच्या संकल्पनेवर एक हलका फुलका कटाक्ष आहे, तसाच कटाक्ष आहे बोली व लेखी भाषेमधील अवाजवी अंतरावर. हे अंतर जर कमी करता आले नाही तर ''प्रिंटिंग मशीनं माणसाला जाती बाहेर काढतील.''

कवितेच्या दुसऱ्या धाग्यातून व्यक्त होते भाषेची मर्यादा. माणसाला समजण्यासाठी आणि माणसांच्या अभिव्यक्तीसाठी कोणतीही भाषा तोटकीच पडते. ''खरी माणुसकी आहे बोललेलं ऐकण्यात - आणि न बोललेलं पण'' माणसांच्या सगळ्या भावना भाषेतून व्यक्त करता येत नाहीत. परंतु भाषेत वापरले जाणारे सर्वच शब्द अर्थपूर्ण असतात असे ही नाही. ''हृदय बंद पडलंय मशीन चालू झालंय.'' शब्दबंबाळता म्हणजे भाषा नव्हे.

आणि नंतर ? ''हार पुन्हा त्या पुतळ्याच्या मानेवर जाऊन पडलाय'' रिकामे रिक्त शब्द आणि पोकळ माणूस. भाषा आणि जीवन यांची ही अशी फारकत! म्हणूनच कवितेच्या शेवटी कवीचे आवाहन आहे :

''बोल माणसा, माणसाची भाषा बोल.''

□□□

**कवी : ए-२ चमेली बाग, विश्वविद्यालय मार्ग, वडोदरा ३९० ००२**

**अनुवादिका: १० ए शिक्षकनगर, कोथरूड, पुणे ४११ ०३८.**



अनुक्रमणिका

पुस्तक परीक्षण

# भाषा - आपली सर्वांचीच

अंजनी खेर

*(लेखक: अविनाश बिनीवाले, राज्य मराठी विकाससंस्था, २००० मुंबई, मूल्य रु. १५०/- पृ. १४९)*

जर्मन भाषा आणि साहित्य हा विषय पुण्यातल्या आणि त्या पाठोपाठ मुंबई, कोल्हापूर इ. ठिकाणच्या शाळा, महाविद्यालये आणि विद्यापीठे इथे सुरू होऊन ९० वर्षे झाली. दहा वर्षांपूर्वी पुण्यात सोहळाही साजरा झाला. फ्रेंच भाषेच्या अध्ययन-अध्यापनाला सुरुवात होऊनसुद्धा दीडशेच्या वर वर्षे झाली, मात्र एकदोन अपवाद वगळता एवढ्या दीर्घ परंपरेनंतरही आम्ही परकीय भाषांचे शिक्षक, प्राध्यापक मराठी साहित्य-संस्कृतीच्या मुख्य धारेत आमचे नोंद घेण्याजोगे योगदान देऊ शकलेलो नाही. यात एका बाजूने मराठीकडून आम्ही घ्यावं तेवढं पोषण घेतलेलं नाही अशी एक शक्यता आहे. (मी हेतुत:च पोषण मिळालं नाही असं म्हणत नसून आम्ही ते घेतलं नाही असं जबाबदारीचं माप पदरात घेत म्हणते आहे.) तर दुसऱ्या बाजूने परकीय संस्कृतीकडून पावडरचं दूध आमच्या अभ्यासक्रमांनी दिलं असण्याची शक्यता आहे. हे माझं निरीक्षण-मला स्वत:ला आरोपींमधे धरूनच - मी १९८० च्या सुमारास औरंगाबादला मराठवाडा विद्यापीठात भरलेल्या आधुनिक परकीय भाषाशिक्षकांच्या सेमिनारपासून मांडते आहे. अगदी सहज बघायचं झालं तर खूप जुन्यांपासून समकालीनांपर्यंत - मर्ढेकर, रा. भा. पाटणकर, वि.ना. ढवळे, गो. वि. करंदीकर, रा. भि. जोशी, अशोक केळकर, म.द. हातकणंगलेकर, भालचंद्र नेमाडे, दिलीप चित्रे, मिलिंद मालशे, अविनाश सप्रे वगैरे इंग्लिशच्या प्राध्यापकांकडून मराठीसाठी खूप समीक्षा-तत्त्वचिंतन झाल्याचं दिसून येईल.

या पार्श्वभूमीवर जर्मनचे प्राध्यापक अविनाश बिनीवाले यांच्या 'भाषा-आपली सर्वांचीच' या पुस्तकाचं मन:पूर्वक स्वागत करावंसं वाटतं. भाषा ही संस्कृतीची वाहक असल्याने सर्व सजग भाष शिक्षक थोडे थोडे संस्कृती अभ्यासक बनतच जातात. त्यातून दोन अतिशय भिन्न भाषा-संस्कृतीमधे वावरण्यामुळे परकीय भाषाशिक्षक संस्कृतिविषयक प्रश्नांमधे थोडे जास्तच गुंततात. बिनीवाल्यांनी दोनही संस्कृतींच्या आसपासच्या विस्तृत प्रदेशात ये-जा ठेवल्याचं दिसतं. शिवाय आपले निष्कर्ष, निरीक्षणे मराठीच्या मुख्य





अनुक्रमणिका

धारेसाठी अगदी सहज आस्वाद योग्य असे चटपटीतपणे मांडले आहेत.

लिपी, उच्चार, लेखन संस्कृती वगैरे असंख्य विषयांवर जुलै १९९८ ते डिसेंबर १९९९ या काळात 'लोकसत्ता' च्या साप्ताहिक पुरवणीत प्रसिद्ध झालेल्या त्यांच्या अठ्ठ्याहत्तरपैकी सत्तेचाळीस लेखांचा हा संग्रह राज्य मराठी विकास संस्थेने फेब्रुवारी २००० मधे प्रकाशित केला. आपल्या मनोगतात बिनीवाल्यांनी हे लेख निवडताना कुठले निकष बाळगले होते ते नोंदवलेलं नाही. प्रथमदर्शनी, म्हणजे अनुक्रमणिकेवर एक नजर टाकता वैविध्य, भाषेच्या पैलूंचा विस्तृत पट आवाक्यात घेणे असा विचार असावा असं वाटतं. हावभाव, मोडी, शब्दकोश, भाषा अध्यापनाची डायरेक्ट मेथड, संगणक, लिपी सुधारणा, नसणे हे मराठीतलं वैशिष्ट्यपूर्ण क्रियापद, पूर्वांचलातल्या भाषिक समस्या, शीघ्रलेखन वगैरे असंख्य सुटे सुटे विषय येतात. साप्ताहिक पुरवणीचा वाचक सर्वसामान्य (म्हणजे तज्ज्ञ नसलेला अशा अर्थाने) असतो हे लक्षात घेऊन या छोटेखानी लेखनासाठी रुचीवैविध्य त्यांनी साधलं आहे.

त्यांचे काही वेचक निष्कर्ष, काही निरीक्षणं म्हणजे त्यांच्या बहुश्रुततेची आणि सैध्दांतिक चिंतनाची साक्ष आहेत.

उदा.
- भाषेचं माधुर्य हे व्यक्तिनिष्ठ असतं. त्याचे वस्तुनिष्ठ मानदंड ठरलेले नाहीत.
- उत्तम भाषेच्या जोडीला त्या त्या भाषेचे भाषक जे हावभाव करतात तेही शिकून घेतल्यास परभाषेतील आपलं संज्ञापन चांगलं होतं.
- उच्चारांचा पंडिती वळणाचा खणखणीतपणा हा सर्व भाषांचं समान मूल्य होऊ शकत नाही.
- मराठीने ॲ आणि ऑ हे दोन इंग्लिशचे ध्वनी खळखळ न करता खूप वर्षांपूर्वीच स्वीकारून त्यांना ''V'' हे स्वतंत्र चिन्हही दिलं. हिंदीतल्या सारखं नऊयोरक (न्यूयॉर्क) किंवा बैंक (बँक) असं हेंगाडं लिखाण मराठीत करावं लागत नाही.
- मराठीच्या अंकलिपीत ऐ ऐनकातला, ठठेरातला, ब बढईतला यायला लागला आहे. हे हिंदीचं आक्रमण की मराठी माणसाचा निष्काळजीपणा?
- संस्कृतमध्ये क्रियापदांची रूपं आणि अस्मद्, युष्मद् ही सर्वनामं कसलाही लिंगभेद करत नाहीत यावरून प्राचीन काळी स्त्रीचं भाषिक स्थान समानतेचं होतं असा निष्कर्ष काढता येतो.

भाषा शुद्ध-अशुद्ध काही नसते हे आधुनिक भाषाविज्ञानाचं तत्त्व सांगताना

प्रमाणीकरण मात्र झालं पाहिजे, कारण त्याचे फायदे असतात असं ते अधोरेखित करतात. पण प्रमाणीकरण कोणाच्या बोलीचं व्हावं ? ते बहुधा पुढारलेल्या समाजाच्या बोलीचं होतं आणि आर्थिक दृष्ट्या मागासलेल्या समाजाची भाषा अशुद्ध ठरते किंवा अप्रमाण ठरते. हा, कुत्रं आपली शेपटी पकडायला बघतं आणि नुसतंच गोल गोल फिरतं तसा विचारव्यूह झाला. त्याकडे त्यांनी लक्ष पुरवलेलं नाही. याच लेखात (क्र. ६ भाषा - शुद्ध आणि अशुद्ध) पान १८ वर त्यांनी म्हटलं आहे की एखाद्या लोकोत्तर, विलक्षण प्रतिभावान पुरुषाचा त्या समाजावर एवढा प्रभाव पडतो की त्याची बोली हीच प्रमाण बनते. या ठिकाणी त्यांनी उदाहरण दिलं असतं तर बरं झालं असतं. एखाद्याच माणसाची - कितीही का लोकोत्तर असेना- बोली प्रमाण बनते हे तर्कदृष्ट्या अवघड वाटतं.

'हवाल्यावर टवाला' हा एक उत्तम जमलेल्या लेखांपैकी एक आहे. माणसाच्या भाषेत त्याच्या संस्कृतीचं स्वच्छ प्रतिबिंब पडतं याचं निर्देशक म्हणून ते हिंदी आणि मराठीच्या संदर्भात प्रयोजक (कारक, Causative) रचनांची तुलना मांडतात. मराठीत या रचनांचा उपयोग खूप कमी होतो. कारण अंगात उत्तरेतल्यासारखी जमीनदारी मुरलेली नाही. हिंदी भाषक करवा लेते है, भिजवा देते है, अभी करवाते है अशा रचना सहज वापरत असतात. करवतो, देववतो, लिहवतो हे प्रयोग मराठीत दुर्मिळ. भंडारा आणि कोल्हापूर या दोन सुपीक जिल्ह्यांपैकी कोल्हापूर कृषीमुळे संपन्न, हाताखाली नोकरचाकर बाळगण्यासारखी स्थिती असलेल्यांचा. तिथेही 'केरबाबरोबर धाडतो', 'गणपालाच लावून देतो', 'बाळूकडून लोटून घेतो' असं साधं कर्तरी क्रियापद वापरलं जातं; देववतो, लोटवतो, घालववतो असं प्रयोजक नाही. ''हिंदीतल्या अस्सल प्रयोजक रचनेचा बादशाही थाट आणि नबाबी मस्ती'' कोल्हापूरलासुद्धा जमत नाही.

लिपी हा त्यांच्या विशेष आस्थेचा विषय दिसतो. या विषयावर चार लेख आहेत. 'भारतीय लिप्यांची एकात्मता' हा विशेष चिंतनीय वाटतो. रोमन आणि देवनागरी या दोनही लिप्यांच्या प्रेमिकांचे गट भारतीय भाषांनी आपली प्रादेशिक वळणे टाकून देऊन भारताच्या एकात्मतेसाठी रोमनचाच / देवनागरीचाच वापर करावा असा आग्रह धरतात. पण ही अत्यंत स्वाभााविक आणि म्हणून सुंदर असलेली वळणं बदलण्याचं काही कारण नाही, असं बिनीवाले म्हणतात. कारण ते मुळात देवनागरीचेच वेगवेगळे आविष्कार आहेत. खरोखर तळमळ असेल तर एका दिवसात नव्हे केवळ दोन-चार तासांत देवनागरी येणाऱ्या कोणालाही ही प्रादेशिक वळणं शिकता येतील; असा बिनीवाल्यांचा दावा आहे. आता या लेखनानंतरची पुढची कामगिरी म्हणून त्यांनी भाषा आणि जीवनच्या

वाचकांसाठी सविस्तर लेख लिहून कार्यशाळाही घ्यावी अशी विनंती आहे.

भाषेच्या नावावर माणसांना एकमेकांपासून तोडणं चालू असतं. ते शक्य होतं कारण आपलं एकमेकांच्याबद्दलचं घोर अज्ञान जास्तीत जास्त देशी-परदेशी भाषांचा परिचय करून घेऊन (शिकूनच असं नव्हे - कारण ते कठीण आहे) ती भाषा ज्या संस्कृतीची वाहक असते त्या संस्कृतीचाही परिचय करून घेत आपण हे अज्ञान संपवू शकतो. अमूर्त संकल्पनाच्या पातळीवर भाषा म्हणजे काय, भाषांचा परिचय कसा करून घ्यायचा यासाठी हा लेखसंग्रह हा एक चांगला मार्गदर्शक होऊ शकेल.

लक्षणीय मुखपृष्ठ, चांगली छपाई आणि चांगला कागद वगैरे निर्मितिमूल्ये चांगली असली तरी दीडशे रुपये ही किंमत जास्त वाटते. उत्तम निर्मितिमूल्ये असलेली कॅसेट (उदा. झाकीर हुसेनचा तबला) जर ६० रु. त मिळत असेल तर ज्या सर्वसामान्यांसाठी हे पुस्तक आहे त्यांना पुस्तकाकडे वळवण्यासाठी त्याची किंमत कॅसेटच्या जवळपास येईल असं पाहिलं पाहिजे. आणि राज्य मराठी विकास संस्थेला सवलतीच्या दरात कागद वगैरे उपलब्धी असाव्यात असा माझा तर्क आहे.

□□□

**सी ३ कला-बसंत, भांडारकर रस्ता, पुणे- ४११ ००४.**

---

## ''ओळखेल तो चतुर शहाणा...''

लिपीच्या जगात नुकतीच शिरलेली मुलं अपार उत्साहानं मनातलं कागदावर उतरवताना पाहणं या अनुभवातली टवटवी कधीच कमी होत नाही !

बाराखडी चिन्हांची ओळख झाल्यावर एखादं अक्षर निवडून त्याला एकेक चिन्ह जोडायचं आणि त्यापासून सुरू होणारा एकेक शब्द आठवून लिहायचा असा खेळ दुसरीच्या वर्गात घेतला जातो. न -नवीन, ना-ना१क, नि-निघाली.... याप्रमाणे फक्त नामं न शोधता क्रियापदं, विशेषणं, क्रियाविशेषणं शोधायलाही मुलांना उद्युक्त केलं जातं.

एकदा प, पा, पि .... अक्षरांनी सुरू होणारे शब्द मुलांनी शोधले. मुलांना शब्द कसे 'दिसतात' ते एका मुलाच्या वहीत डोकावल्यावर दिसलं 'प:' साठी शब्द शोधणं अनिवार्य नव्हतं, तरीही त्यानं एक शब्द लिहिता होता - 'प: ट'. क्षणभर मी बुचकळ्यात पडले! मग कळलं, पहाटेचं हे रूप प्रभात फेरीला गेलं असताना कधी दिसलं नव्हतं !

**प्रेषक : वर्षा सहस्रबुद्धे**

**शाळा प्रमुख, अक्षरनंदन, भांडारकर इन्स्टिटयूट रस्ता, पुणे-४११ ००४.**

साद प्रतिसाद- १

# अभ्यासक्रमात मराठी : अज्ञानमूलक विधाने

निशिकांत मिरजकर

भाषा आणि जीवन चा १९९९ चा दिवाळी अंक मिळाला. 'विविध अभ्यासक्रमांतील मराठीचे स्थान' या दत्तात्रेय पुंडे यांच्या लेखातील दोन विधानांबद्दल काही लिहिण्यासाठी हे पत्र

१) पृ. ३४ वर पुंडे म्हणतात, आय्.ए. एस्. चा मराठीचा अभ्यासक्रम (नेमलेल्या पाठ्यपुस्तकांसहित ) गेला १५ वर्षे आहे तोच आहे. त्यात काहीही स्थित्यंतर करण्याची गरज लोकसेवा आयोगालाही वाटत नाही आणि प्रश्नपत्रिका काढणाऱ्या, उत्तरपत्रिका तपासणाऱ्या तज्ज्ञांनाही वाटत नाही.

हे विधान उतावळेपणाचे आणि अज्ञानमूलक आहे. त्यातील तुच्छतायुक्त उपरोध तर अगदीच अनाठायी आहे.

प्रश्नपत्रिका काढणाऱ्यांची आणि उत्तरपत्रिका तपासणाऱ्यांची नावे गोपनीय असल्यामुळे येथे देता येत नाहीत. पण प्रश्नपत्रिका काढणाऱ्यांनी आणि उत्तरपत्रिका तपासणाऱ्यांनी मराठीचा अभ्यासक्रम बदलण्याची गरज वारंवार पत्रे लिहून लोकसेवा आयोगाच्या अधिकाऱ्यांच्या ध्यानी आणून दिलेली आहे, एवढे मात्र मी स्वत:च्या माहितीनुसार निश्चितपणे सांगू शकतो. केवळ एकाच विषयाच्या अभ्यासक्रमात बदल करता येत नाही; सर्वच विषयांचे अभ्यासक्रम एकदमच पुन: परीक्षण करून बदलावे लागतात; त्यासाठी काही एक निश्चित कार्यपद्धती असते; ही लोकसेवा आयोगाची या बाबतीतली बाजू होती.

त्याप्रमाणे कार्यवाही करून यंदाच्याच वर्षी लोकसेवा आयोगाने सर्व विषयांचे अभ्यासक्रम पुन:परीक्षित करून बदललेले आहेत. त्या नुसार मराठीचा अभ्यासक्रमही (नेमलेल्या सर्वच्या सर्व पाठ्यपुस्तकांसहित) बदललेला आहे. पुंडे यांचा लेख जानेवारी १९९८ मधे लिहिलेला असला तरी त्याचे हे सुधारित रूप प्रस्तुत अंकात छापलेले असल्यामुळे या विधानाबाबत ही 'सुधारणा' करणे आवश्यक होते.

आणखी एक विसंगती. 'आय. ए. एस. चा अभ्यासक्रम' असे नामाभिधान करणेही उथळपणाचे आहे. त्याऐवजी 'सिव्हिल सर्व्हिसेसच्या परीक्षांचा अभ्यासक्रम'

असे म्हणायला हवे. या स्पर्धांत यश मिळविणाऱ्या सर्वांनाच आय.ए. एस. मिळत नाही. काही मोजक्यांनाच ते भाग्य प्राप्त होते. बाकीच्यांना अन्य पदांवर समाधान मानावे लागते. या परीक्षांमध्ये मराठी विषय घेतलेल्यांपैकी माझ्या माहितीचे किमान दोघेजण 'आय.एफ.एस.' झालेले आहेत, एकजण 'आय्.पी.एस्.' आहे आणि दोघे इन्कमटॅक्स विभागात आहेत. त्या सर्वांचा मराठीचा अभ्यासक्रम एकच होता. 'आय.ए. एस.' चा वेगळा अभ्यासक्रम नसतो.

२) पृ. ३५ वर पुंडे म्हणतात, ''अमराठी लोकांसाठी मराठीचे अध्यापन करू शकतील अशा मराठीच्या प्राध्यापकांची गणना आरंभिली तर काय चित्र दिसेल? डॉ. कल्याण काळे व डॉ. अंजली सोमण ही नावे वगळली तर तिसरे नाव आपल्या डोळ्यांसमोर येत नाही.''

हेही विधान अज्ञानमूलक असल्यामुळे संकुचितपणाचे झालेले आहे. दिल्ली विद्यापीठात मी स्वत: आणि डॉ. ललिता मिरजकर असे दोघेजण गेली बावीस वर्षे अमराठी लोकांना 'सर्टिफिकेट कोर्स इन मराठी', 'डिप्लोमा कोर्स इन मराठी' आणि 'ॲडव्हान्स्ड डिप्लेमा इन मराठी' शिकवत आहोत. या काळात रशियन विद्यार्थ्यांनाही आम्ही मराठी शिकवले. आमची एक विद्यार्थिनी मॉस्को रेडिओवरून मराठी वार्तापत्र देत होती, आणि दुसरी विद्यार्थिनी मॉस्को विद्यापीठात अध्यापन करीत होती. नुकतीच एका पंजाबी विद्यार्थ्याने महानुभावीय मराठी साहित्य अभ्यासून महदाइसेवर हिंदीमध्ये चरित्रात्मक कादंबरी लिहिली आहे. अशाच प्रकारचे कार्य डॉ. वा. के. लेले यांनी काशी विद्यापीठात अनेक वर्षे केले, आणि ते निवृत्त झाले तरी त्यांचे सहकारी डॉ. सुरेश भृगुवार अजूनही करीत आहेत. अलीगढ मुस्लिम विद्यापीठात डॉ. श्रीनिवास सिरास अमराठी विद्यार्थ्यांना मराठी शिकवत आहेत. हे सारे मराठीचेच प्राध्यापक आहेत.

केवळ महाराष्ट्रापुरती, त्यातही मुंबई-पुण्यापुरती, त्यातही विशेषत: पुण्यापुरतीच माहिती हाताशी घेऊन त्या आधारावर लंबीचौडी अतिरिक्त विधाने करण्याची सवय महाराष्ट्रातले, त्यातही पुणेरी, प्राध्यापक जितक्या लौकर सोडून देतील तितका त्यांच्या अभ्यासात नेमकेपणा लौकर येईल.

वरील दोन्ही विधानांविषयीच्या प्रतिक्रिया भाषा आणि जीवन च्या पुढील अंकात प्रसिद्ध कराल काय?

□□□

**ए १/८ मॉरिसनगर, दिल्ली ११० ००७.**

# अभ्यासक्रमात मराठी : माझा अनुभव

विजया देव

## (अ) अमराठी जिज्ञासूंना मराठी भाषा अध्यापन

परदेशातून महाराष्ट्रात- पुण्यात - संशोधनासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठी भाषा शिकवणे, संस्कृतिपरिचय करून देणे, संशोधन विषयाच्या आनुषंगाने मार्गदर्शन करणे अशा स्वरूपाची कामे गेली दहा वर्षे मी पुण्यात करत आलेली आहे.

माझ्या विद्यार्थ्यांमध्ये प्रामुख्याने अमेरिकन व त्याखालोखाल जर्मन संशोधकांची गणना होते. हे लोक फुलब्राइट शिष्यवृत्तीधारक, पीएच. डी. प्रबंधोत्तर संशोधक, पीएच. डी. साठी अभ्यास करणारे, अमेरिकन इन्स्टिट्यूट ऑफ इंडियन स्टडीज (AIIS) मार्फत आलेले किंवा स्वतंत्रपणे (कुणी माझा संदर्भ दिला, म्हणून) आलेले असतात.

प्रत्येकाच्या गरजा, वास्तव्याचा काळ, उद्दिष्टे आणि कार्यक्रम वेगवेगळे असल्यामुळे एकावेळी माझ्याकडे एकच विद्यार्थी असतो. मराठी भाषा अध्यापनाचा कालावधीही वेगवेगळा असतो. AIIS च्या आराखड्यानुसार, पूर्ण शैक्षणिक वर्षभर ‘श्रीगणेशा’पासून मराठी भाषा शिकवणे हा एक प्रकार. हा कधी जवळपास पूर्ण एकटीने राबविलेला आहे तर कधी दुसऱ्या अनुभवी अध्यापकांसमवेत विभागून घेतलेला आहे.

कधी एखादा विद्यार्थी काही महिनेच राहणारा असतो. त्याच्यासाठी अभ्याक्रम ठरवून पूर्वतयारी व उद्दिष्ट लक्षात घेऊन स्वतःच आराखडा, आशय व तासिका ठरवाव्या लागतात. पूर्ण जबाबदारी घ्यावी लागते. ती मी अनेकदा पार पाडलेली आहे व ते विद्यार्थी आपल्या मराठीने स्थानिक पुणेकरांना चांगल्या अर्थाने चकित करून गेलेले आहेत. ‘भाषा आणि जीवन’ साठी लिहिण्याचीही एखाद्याने तंबी दिलेली आहे.

काहींना मराठीचे थोडे पूर्वज्ञान असते व त्यांच्या त्यांच्या संशोधनविषयात मराठीत जे लेखन झालेले असेल त्याचा चिकित्सक आढावा त्यांना घ्यायचा असतो. तिथे कामाचे स्वरूप थोडे बदलते. तिथे सामग्री मार्गदर्शक, संशोधनसहायक, अनुवादक अशी भूमिका होते.

यांपैकी कोणतेही काम भाषा शिक्षकाला आनंदाचे व आव्हानात्मक असते. कल्पकता, भाषा-भूमी-संस्कृतीची खोल जाण यांची कसोटी लागते. मात्र भाषा शिकवण्यासाठी कोणत्याही तयार पुस्तकावर, सामग्रीवर कधीच पूर्णपणे अवलंबून राहता येत नाही. विद्यार्थ्यांच्या प्रगतीचा, प्रगल्भतेचा, अभ्यासविषयाचा अंदाज घेत स्वतःची

सामग्री वेळोवेळी तयार करणे, मराठीतल्या उपलब्ध लेखनाचा (जे लेखन मुळात भाषा अध्यापनासाठी निर्माण झालेले नाही अशा लेखनाचा) भाषा शिकवण्यासाठी वापर करून घेणे, हा भाषा शिक्षकाच्या पूर्वतयारीचा भाग असतो.

माझ्याकडे शिकून गेलेले विद्यार्थी इतिहास, अर्थशास्त्र, रसायनशास्त्र, धर्मशास्त्र, मानववंशशास्त्र अशा विविध विद्याशाखांमधले संशोधक होते. यांपैकी एका विद्यार्थ्याने गंगाधर गाडगीळ, मोकाशी, सानेगुरुजी, व्यंकटेश माडगूळकर यांच्या साहित्याचे वाचन करून त्यांपैकी निवडक भागांचा अनुवादही करायला घेतलेला आहे. विशेष म्हणजे या विद्यार्थ्याने त्याच्या मातृभाषेतील ललित साहित्यही फारसे वाचलेले नाही. परभाषेची इतकी गोडी लागणे हाच भाषाशिक्षकाचा आनंद.

आ) लोकसेवा आयोगाच्या, मराठी विषयाची निवड केलेल्या उमेदवारांना त्या संपूर्ण विषयाचे मार्गदर्शन करणे, हेही मी गेली नऊ-दहा वर्षे करीत आलेली आहे. विद्यार्थ्यांची पात्रता जोखणे, अभ्यासक्रमाचे सर्व विभाग शिकवणे, संदर्भ साहित्य सुचवणे, लेखन मार्गदर्शन असे या कामाचे भाग पडतात. वाङ्मयाच्या विद्यार्थ्यांना मराठी शिकवणे व या उमेदवारांना तशाच स्वरूपाचा अभ्यासक्रम शिकवणे यात मुळात भेद करावा लागतो. वाङ्मयाची क्रमिक पुस्तके, वाङ्मयाचा इतिहास, समीक्षा-साहित्यशास्त्र, भाषिक विकास, व्याकरण यांचे परिशीलन आणि प्रशासकीय सेवेतील विद्यार्थ्यांची कारकीर्द यांचा अनुबंध जोडून दाखवावा लागतो. भाषा आणि वाङ्मय यांच्या अभ्यासाने आपली संस्कृती, लोकजीवन परंपरा यांच्याविषयीची जाण कशी परिपक्व होते, हे आयोगाच्या विद्यार्थ्यांपुढे स्पष्ट करावे लागते. नाहीतर मराठी विषयाचा अभ्यास परीक्षेपुरता राहतो आणि प्रत्यक्ष प्रशासकीय लोकसेवेत निबरपणा येत जातो. हे टाळण्याची जबाबदारी माझिया जातीच्या शिक्षकाची असते. माझा एक विद्यार्थी आय. पी.एस. मध्ये सर्वप्रथम आलेला आहे.

हे सर्व लिहिण्याचा उद्देश असा की मराठी शिकवणे हे विविधांगी, आव्हानात्मक काम आहे. हे करणाऱ्यांची संख्या निश्चितच वाढायला हवी आहे. एवढेच नव्हे तर त्यासाठी विशेष प्रशिक्षणाचीही गरज आहे. आज स्वयंस्फूर्तीने अशा प्रकारचे मराठी अध्यापन करणाऱ्यांना या कामाचा आवाका काय हे माहीत नसते. स्वत:ची अध्यापन कौशल्ये विकसित करण्याची निकड काहींना जाणवत नाही तर काहींना सोय-साम्रगी, प्रशिक्षण यांच्या अभावी आहे त्या परिस्थितीत समाधान मानावे लागते

□□□



अनुक्रमणिका

# व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली

सत्त्वशीला सामंत

'भाषा आणि जीवन' अंक १८:१ हिवाळा २००० यामध्ये, माझ्या 'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' या पुस्तकावर प्रा. (डॉ.) मा. ना. आचार्य ह्यांनी परीक्षणलेख लिहिलेला आहे. माझे पुस्तक त्यांनी बारकाईने वाचले असून, मला प्रतिकूल का होईना, पण सविस्तर व चिकित्सक परीक्षणलेख लिहिल्यामुळे या पुस्तकाकडे चिकित्सक वाचकांचे लक्ष वेधले जाणार आहे; त्याबद्दल त्यांना अनेकश: धन्यवाद. तथापि, त्यांच्या सद्भावनेचा यत्किंचितही अनादर न करता, कांही मुद्द्यांविषयी मी अधिक खुलासा करू इच्छिते. कारण तसे न केल्यास, वाचकांचा माझ्या पुस्तकाविषयी गैरसमज होण्याची शक्यता आहे. म्हणून हे टिपण देते :-

१) हे पुस्तक मुख्यत: व्याकरणावरील पुस्तक नसून, शुद्धलेखन- प्रणालीच्या अनुषंगाने आवश्यक तेवढेच व्याकरण त्यात दिले आहे हा मुद्दा 'मनोगता'त स्पष्ट केलेला आहे.

२) जे काही थोडेफार व्याकरण दिले आहे त्याबद्दलही वैयाकरणांमध्ये आपसात मतभेद आहेतच - उदा. विभक्ती कशावरून ओळखावी -प्रत्ययांवरून की अर्थावरून? किती विभक्ती मानाव्यात, इ.

३) त्यांपैकी सर्वसाधारणपणे मला जो विचार योग्य वाटला तो मी स्वीकारला आहे. तसेच, 'जुने ते सर्वच सोने', 'जुनें जाऊं द्या मरणालागुनि' या दोन टोकांमधला मध्यममार्ग मी पत्करला आहे. काही ठिकाणी मी स्वत:च संभ्रमा आहे. उदा. 'शी' आणि 'शीं' या प्रत्ययांमधील भेद 'पोटाशी', 'पाठीशी' यांमधील 'शी' हा प्रत्यय द्वितीयेच्या 'स' किंवा 'सी' चे रूपांतर समजून मी तो द्वितीयेचा प्रत्यय ठरवला आहे. पण अधिक विचारान्तीं, मला तो 'पाशी' या शब्दयोगी अव्ययाचा अवशेष असावा असे वाटूं लागले आहे. (कै. मो. के. दामले यांच्या 'शास्त्रीय मराठी व्याकरण' ग्रंथात अशा आशयाचे एक विधानही आहे. दुसरी आवृत्ति १९२५-पृ. ३५६) त्यामुळे 'शीं' हा प्रत्यय अधिकरणवाचक सप्तमीचा मानावा काय असा मी फेरविचार करीत आहे. पण शुद्धलेखनशास्त्राच्या दृष्टीने त्याची नेमकी विभक्ति ठरवण्यापेक्षा, 'शीं' (पाशी) व 'शीं' (तुलना) यांत फरक करणे मला अधिक महत्त्वाचे वाटते.





अनुक्रमणिका

४) 'शीं' हा तृतीयेचा प्रत्यय 'तुलना' करण्यासाठी वापरला जातो. या ठिकाणी 'तुलना' याचा शब्दश: फक्त comparison एवढाच अर्थ मला अभिप्रेत नाही, तर इंग्रजीतील vis-a-vis या शब्दप्रयोगात जी संकल्पना अनुस्यूत आहे (face-to-face with, in relation to, as compared with) ती मला येथे अभिप्रेत आहे. दामलेंच्या व्याकरणात 'तो बापाशीं भांडला' असेही तृतीयेचे एक उदाहरण दिले आहे. (पण ते चुकीने 'सनिधि' या सदराखाली दिले गेले आहे. पृ. ६६९.)

५) 'विद्यर्थिगृह' यांसारखे सामासिक शब्द 'कर्मणि प्रयोग', 'कर्तरि प्रयोग' यांच्याप्रमाणेच संस्कृतमधून अखंडत्वानेच कां स्वीकारूं नयेत असा प्रा. आचार्यांचा सवाल आहे. त्याला उत्तर असे की, 'कर्मणि प्रयोग', इ. अलुक् समासाची उदाहरणे आहेत. 'कर्मणि' हे 'कर्मन्' या संस्कृत शब्दाचे संस्कृत सप्तम्यन्त रूप आहे (उदा. कर्मणि एव अधिकार: ते।) संस्कृतमधील विभक्तिप्रत्ययांचा लोप न होता तयार झालेले काही सामासिक शब्दसमूह मराठीने स्वीकारले असून त्यांना 'अलुक् समास' म्हणतात. उदा. :- निशिगंध, वाचिवीर, गेहेशूर, सरसिज, मूले कुठार इ. याउलट, विद्यार्थिगृह' हा अलुक् समास नव्हे. तो फक्त संस्कृतच्या वळणाने घडलेला मराठी सामासिक शब्द आहे. मराठी शब्दकोशांत 'विद्यार्थि' असा ऱ्हस्वान्त रूपातील स्वतंत्र शब्द मिळणार नाही, पण संस्कृतमधील 'विद्यार्थि' असे एकवचनी रूपच मराठी कोशांत मिळेल. म्हणून 'विद्यार्थि + गृह' असा मराठी पद्धतीने सामासिक शब्द घडवावा, म्हणजे समास करताना लोकांना ऱ्हस्व-दीर्घ-विवेक करणे सोपे जाईल असे मी म्हटले आहे.

('कर्तरि' व 'कर्मणि' यांच्या चालीवर मो. के. दामले यांनी 'भावी प्रयोग' अशी संज्ञा वापरली आहे हे खरे; पण एकतर त्यांनी 'कर्तरि' व 'कर्मणि' याही संज्ञांचे दीर्घीकरण केलेले नाही व मूळच्या 'भावे प्रयोग' या संज्ञेत 'भावे' हाही 'कर्तरि कर्मणि' यांच्याप्रमाणेच संस्कृत सप्तम्यन्त शब्द आहे हे दामल्यांना उमजलेले दिसत नाही. तसेच, दामल्यांनी केलेला हा चुकीचा शब्दप्रयोग सर्वच वैयाकरणांनी - उदा. मो.स. मोने यांनी स्वीकारलेला नाही. 'कर्मणि प्रयोग' इ. ना. मराठी वळण द्यावयाचे झाल्यास, 'कर्मप्रयोग', 'कर्ताप्रयोग' व 'भावप्रयोग' (कर्म -कर्ता- भावनिष्ठ प्रयोग) अशी शब्दयोजना रूढ करावी लागेल. 'भाव' याचा अर्थ-a term for an impersonal passive or neuter verb वा. शि. आपटे यांचा शब्दकोष.)

तसेच, 'विद्यार्थिगृह' हा सामासिक पदसमूह आहे, तर 'पक्षिणी', 'स्वामिनी' हे शब्द सामासिक नसून, एकपदी आहेत व ते मराठी कोशांत स्वतंत्रपणे

आढळू शकतात. म्हणून, दोहोंची तुलना होऊ शकत नाही.

६) 'कर्मणि प्रयोग' या संज्ञेवरील चर्चेच्या अनुषंगाने, प्रा. आचार्य ह्यांनी 'अनाथ विद्यार्थी गृह' हा सामासिक शब्द कसा लिहावा याचे विवेचन केले आहे. मुळात, 'समास' म्हणजे 'एकमेकांना जोडून लिहिलेल्या दोन किंवा अधिक पदांचा समूह' असा कित्येकांचा गैरसमज आहे. वस्तुत:, एकमेकांशी अर्थाअर्थी काहीच संबंध नसलेली दोन-चार पदे एकापुढे एक या क्रमाने **तोडून वा जोडून** लिहिली तरी त्यांचा समास होत नाही. (उदा. कोट टोपी छत्री भाषा टेबल किंवा कोट-टोपी -छत्री-भाषा-टेबल). **पदे जोडून लिहिणे हे समासाचे व्यवच्छेदक लक्षण नव्हे.** जेव्हा एकापुढे एक याप्रमाणे लिहिलेल्या पदांमधील विभक्तिप्रत्ययांचा किंवा उभयान्वयी अव्यय, इ. चा सर्वसाधारणपणे लोप झालेला असतो (अलुक् समास हा अपवाद.) व तरीही त्या सर्वांमध्ये एक प्रकारचा अर्थान्वय असतो अशा अर्थपूर्ण पदसमूहालाच 'समास' असे म्हणतात. म्हणूनच, सर्व संस्थानामे ('साहित्य संस्कृति मंडळ', 'विश्वकोश निर्मिति मंडळ', इ.), ही देखील सामासिक शब्द समूह आहेत व म्हणून त्यांतील पूर्वपदेही ऱ्हस्वान्त लिहिणें आवश्यक आहे. पण हा समास आहे हेच न कळल्यामुळे त्या संस्था 'संस्कृती मंडळ', 'निर्मिती मंडळ' असे चुकीचे लेखन करतात. आधुनिक काळात बहुपदी समासांची संख्या वाढली असून, त्यांतील पदे तुटक तुटक लिहिण्याची प्रथा सुरू झाली आहे, पण तरीही ते समासच आहेत. त्याचप्रमाणे, 'अनाथ विद्यार्थीगृह' हा समास तोडून न लिहिणे अधिक योग्य. पण तो तोडून लिहिला तरी, 'अनाथ' या पदाला पुढील समासांतर्गत 'विद्यार्थी' या पदाचीच अपेक्षा असल्याने, संस्कृतमध्ये अशा प्रकाराला 'सापेक्ष समास' म्हणतात. (उदा. देवदत्तस्य गुरुकुलम्)

७) मराठीतील आदरार्थी अनेकवचन हे प्रा. आचार्यांच्या मताप्रमाणे व्याकरण- दृष्ट्या 'अनेकवचन' च असू शकेल. पण वास्तवदृष्ट्या ते एकवचनार्थीच असते. कर्ता एकवचनी असतानाही क्रियापद अनेकवचनात योजण्याची प्रथा हिंदीत व इंग्रजीतही आहे. उदा. एखाद्या थोर व्यक्तीचा उल्लेख करताना, हिंदीत 'वह महान् साहित्यकार थे।' असे म्हणण्याचा प्रघात आहे.

इंग्रजीचे ख्यातनाम भाषाभ्यासक प्रा. स्टॅन्ली हसे यांनी आपल्या The English Languqae- Structure & Development या पुस्तकात Grammatical Acceptability या विषयाची चर्चा करताना, एक उदाहरण दिले आहे : ते असे

Everybody is entitled to their opinion.





अनुक्रमणिका

जुन्या काळीं, to his opinion असे म्हणण्याची प्रथा होती. स्त्रीवादी चळवळीचा जोर वाढल्यावर to his or her opinion असा शब्दप्रयोग होऊ लागला. परंतु प्रा. हसे म्हणतात -

"....but 'his or her opinion' or 'her or his opinion' sounds clumsy. So, although everyone is strictly singular (every one), the plural their seems an acceptable way out, especially as we may assume a variety of opinions." (आवृत्ति १९९५. पृ. ७९)

या चालीवर 'रवींद्रनाथ ठाकूर हे थोर कवि (ए.व) होते. (अ.व.)' हा वाक्यप्रयोग समर्थनीय ठरावा.

८) 'यथाशक्ति' हा शब्ध मूलत: क्रिया विशेषण असून (व्याकरणशुद्ध ले. प्र. -पृ. ३४), कधीकधी त्याचा उपयोग विशेषणासारखा होऊ शकतो. (उदा. यथाशक्ति दान-पृ. ३५) उदा. 'गरीब (माणूस)' हा शब्द मुळात विशेषण असला तरी, 'गरिबांना' असे म्हणताना, त्याचा नामासारखा उपयोग होऊ शकतो. म्हणून पृ. ३४ व ३५ यांत काही विसंगती नाही. 'कर्तरि प्रयोग' या समासातील मूळ 'कर्तरि' हे सप्तम्यन्त रूप असले तरी, येथे ते विशेषण म्हणून वापरले आहे व 'कर्तरीत....' या शब्दात त्याचा नामासारखा प्रयोग केलेला आहे.)

९) तत्सम ऱ्हस्वान्त शब्द एकवचनात ऱ्हस्वान्त ('कवि') व अनेकवचनात दीर्घान्त ('कवी') लिहावेत असा माझा प्रस्ताव आहे. तथापि, एकवचनातही त्याचे सामान्यरूप करून तो दीर्घान्त कां लिहू नये असे प्रा. आचार्य म्हणतात. प्रा. आचार्य यांच्या मताशी जुळते असे एक विधान लो. टिळक यांनीही केले आहे. अशा शब्दांचे मूळ रूप ऱ्हस्वान्त मानून, प्रथमा एकवचनापासून ते शब्द सामान्य रूप पावून दीर्घान्त होतात असा नियम करावा असे लो. टिळक यांनीही सुचवले होते. पण त्याचबरोबर, हा नियम लक्षात ठेवणे लहान मुलांना गैरसोईचे होईल असाही त्यांचा अभिप्राय आहे. (मात्र, या बाबतीत टिळकांनी कोणत्याच बाजूने आपले निर्णायक मत नोंदवलेले नाही.) ('लो. टिळक यांचा भाषाविचार'- पृ. ६२/ ६३)

तथापि, लो. टिळकांनी सुचवलेली (व प्रा. आचार्यांचा मान्य असलेली) ही शास्त्रीय व्यवस्था तर्कशुद्ध असली तरी, लहान मुलांनाच काय, पण प्रौढ पत्रकार-साहित्यिक मंडळींनाही ती समजणे कठिण झाले आहे व त्यामुळे बरेच लोक समासातही असे शब्द दीर्घान्तच लिहू लागले आहेत. (एकीकडे प्रा. आचार्य 'विद्यार्थिगृह' हा शब्द संस्कृतच्या पद्धतीप्रमाणे लिहिण्याचा आग्रह धरतात, तर दुसरीकडे साहित्यक्षेत्रातील





अनुक्रमणिका

धुरीण म्हणवणाऱ्या 'साहित्य महामंडळा' ने १९९९ सालच्या साहित्यसंमेलनाच्या टीचभर निमंत्रण पत्रिकेत 'सिद्धिविनायक' व 'कविसंमेलन' हे शब्द चारपांच वेळा 'सिद्धीविनायक' व 'कवीसंमेलन' अशा तऱ्हेने छापल्याचे आढळते. ज्यांनी समाजाचे नेतृत्व करावे त्यांच्या या अभावित (!) पण अक्षम्य चुका म्हणाव्यात की ही आजकालची लेखनप्रवृत्ती म्हणावी? ('प्रवृत्ती' म्हणून समर्थन केले तर, 'पाणिग्रहण' चे 'पाणीग्रहण' हे वर्णलेखनही समर्थनीय ठरावे !)

याउलट, मो. के. दामले यांच्या व्याकरणग्रंथात (पृ. २९५/२९६) यासंबंधातील एका मतामतांतराचा उल्लेख आहे. तत्सम ऱ्हस्वान्त शब्द दोन्ही वचनांत दीर्घान्तच लिहावेत असे 'प्राकृत मत' असून, ते दोन्ही वचनांत ऱ्हस्वान्तच लिहावेत असे 'संस्कृत मत' आहे, तर असे शब्द एकवचनात ऱ्हस्वान्त व अनेकवचनात दीर्घान्त लिहावेत असे 'तडजोडीचे मत' असल्याचे त्यांनी नमूद केले आहे. मी स्वत: हे 'तडजोडीचें मत' स्वीकारले आहे. त्याबद्दलची माझी कारणमीमांसा मी माझ्या पुस्तकात दिली आहे व प्रा. आचार्यांनीही ती उद्धृत केली आहे.

१०) समारोपादाखल मी एवढेच म्हणेन की, -

सर्वसामान्य पत्रकार व साहित्यिक यांना व्याकरणाचे सूक्ष्म ज्ञान असणे अपेक्षित नसते, म्हणून भाषातज्ज्ञांनी व्याकरणाच्याच आधारे, पण सोपे, सुबोध ठोकतोळे व आडाखे नेमून द्यावयाचे असतात. तसे आडाखे नेमून दिले की, व्याकरणाचा सखोल सांगोपांग अभ्यास न करताही, पत्रकार-साहित्यिक इत्यादिकांचे लेखन आपोआप व्याकरणशुद्ध होऊ शकते. माझ्या पुस्तकात मी तसा प्रयत्न केला आहे तरीही मी अनुषंगाने दिलेला व्याकरणाचा एखादा तपशील चुकीचा असूं शकेल किंवा त्यात एखादी त्रुटी असूं शकेल. तशी चूक किंवा त्रुटी लक्षात आल्यास किंवा कोणी ती लक्षात आणून दिल्यास, पुढील आवृत्तीत - ती निघालीच तर - मी अवश्य दुरुस्ती करीन. परंतु, शुद्धलेखनाला व्याकरणाचे अधिष्ठान असावे, केवळ उच्चाराचे असू नये या माझ्या मूलतत्त्वालाच मी छेद दिला आहे असा त्याचा अर्थ होत नाही.

एवढ्या विवेचनावरून, माझ्या पुस्तकाचा व्याकरणिक पाया किती मजबूत वा किती डळमळीत आहे हे वाचकांनीच ठरवावे. इत्यलम् ।

□□□

**१६, यशोदाकुंज सोसायटी, सी.टी.एस्. ३३२, तेजसनगर,**
**कोथरूड, पुणे ४११ ०२९**





अनुक्रमणिका

# पुन्हा एकदा व्याकरणाविषयी थोडेसे-

माधव ना. आचार्य

'व्याकरणशुद्ध लेखनप्रणाली' या पुस्तकाच्या माझ्या परीक्षण- लेखावरील श्रीमंती सामंतांची ता. १२ सप्टें. २००० रोजीच्या पत्रातील प्रतिक्रिया वाचली. परीक्षणामागील माझ्या सद्भावनेची जाण ठेवल्याबद्दल त्यांचे आभार. त्याचप्रमाणे मी परीक्षणलेखात दाखवून दिलेल्या व्याकरणिक त्रुटींपैकी ज्यांना त्यांनी प्रस्तुत पत्रात उत्तरे दिलेली नाहीत त्या त्यांना मान्य आहेत असे गृहीत धरून त्याबद्दलही मी त्यांचे मन:पूर्वक आभार मानतो.

माझ्या मूळ परीक्षणलेखात नोंदल्याप्रमाणे मराठीच्या पारंपरिक व्याकरणाला कृष्णशास्त्री चिपळूणकरांपासूनच्या चिकित्सकांकडून काही व्यवस्थासूत्रे मिळत गेलेली आहेत. ती जर लक्षात घेतली तर मराठी व्याकरणातील अनेक समस्या सोडविण्याची दिशा मिळते. मग मतभेदांना जागा राहिलीच तर ती केवळ तपशिलापुरती राहते.

व्याकरण हे एक शास्त्र आहे, हे सर्वांनाच मान्य आहे. प्रमाण, प्रमेय व प्रयोजन ही कोणत्याही शास्त्राची नियंत्रणसूत्रे असतात. यांपैकी प्रामुख्याने प्रमाणाविषयक प्रमादांमुळे मराठी व्याकरणात समस्या निर्माण झाल्या. या प्रमादांतील काही महत्त्वाचे असे - संस्कृत वा इंग्रजी यासारखी अन्य भाषा प्रमाण मानून तदनुसार मराठीचे व्याकरण सांगणे, व्युत्पत्तीला कौल लावून वर्तमान मराठीतील रूपांचा निर्णय करणे, पदान्वयात तर्काला महत्त्व देणे, रूप व अर्थ यांतील गौणप्रधानभाव लक्षात न घेणे व प्रत्ययार्थापेक्षा प्रकृत्यर्थाला महत्त्व देणे.

प्रमाणविचारातील अशा काही प्रमादांची सुसंगत व तर्कशुद्ध छाननी मराठीतील व्याकरण परीक्षणकारांनी केलेली आहे. ती जर नीट लक्षात घेतली तर श्रीमती सामंतांनी प्रस्तुत पत्रात उपस्थित केलेल्या प्रश्नांना उत्तरे मिळतील.

मग, 'शी' या प्रत्ययाच्या व्युत्पत्तीपेक्षा त्याच्या वर्तमान मराठीतील कार्यावरून निर्णय करता येईल. संस्कृतकडे न पाहताही कर्तरी व कर्मणी या शब्दरूपांचा विचार करता येईल. वचननिर्णयासाठीही अन्य भाषांकडे वळावे लागणार नाही. या संदर्भातील 'रवींद्रनाथ ठाकूर हे थोर कवी होते' या उदाहरणातील 'हे' या कर्तृपदाशी असणारे 'कवी' या पदाचे सामानाधिकरण्य लक्षात येऊन वचननिर्णय करता येईल. रूढ शब्दजातींमधील पदतत्त्व व पदान्वयतत्त्व यांमध्ये विवेक करता आला की विशेषण

व क्रियाविशेषण यांबद्दलचा तिढा सुटेल आणि समासांचा केवळ संस्कृतानुसारी विचार न करता मराठीच्या दृष्टीने त्यांमध्ये करावयाचे बदल मान्य होतील.

या सर्व विचारांचा तपशील देऊन मी उगीच जागा अडवीत नाही. कारण सामंतांनी आपल्या पत्रात व्याकरणविषयक बरीच माहिती प्रदर्शित केली आहे आणि पत्राच्या शेवटी आपल्या विवेचनाचा व्याकरणिक पाया मजबूत असल्याचेही ध्वनित केले आहे. त्यामुळे ज्यांना पुनः पुन्हा सांगावे लागते अशा व्यक्तींमध्ये मी सामंतांची गणना बिलकूल करीत नाही.

म्हणूनच या विषयाचा मी माझ्यापुरता निरोप घेत आहे. मात्र तत्पूर्वी सामंतांच्या पत्रातील एक माहितीची चूक दुरुस्त करतो.

दामल्यांनी वापरलेल्या 'भावी' या संज्ञेच्या संदर्भात सामंत म्हणतात, '...मूळच्या भावे प्रयोग या संज्ञेत 'भावे' हा 'कर्तरि-कर्मणि' यांप्रमाणेच सप्तम्यन्त शब्द आहे, हे दामल्यांना उमजलेले दिसत नाही.'

यामुळे दामल्यांविषयी वाचकांचा गैरसमज होण्याची शक्यता आहे. तेव्हा याबाबतची वस्तुस्थिती नोंदली पाहिजे. 'क्रियापदे' नामक सहाव्या अध्यायात कर्तरी, कर्मणी व भावे / भावी या संज्ञांविषयी माहिती देताना दामले म्हणतात, 'कर्तरी, कर्मणी व भावे यांचा मराठीमध्ये विशेषणांसारखा उपयोग होतो. परंतु मूळ संस्कृतात ही विशेषणे नसून कर्तृ, कर्मन् व भाव ह्या शब्दांची सप्तमीची एकवचन रूपे आहेत. 'भावी' हे मात्र 'भाव' शब्दापासून साधलेले विशेषण होय. कर्तरी व कर्मणी ह्यांस बाह्य दृष्टीस जुळणारे हे 'भावी' विशेषण मराठीत 'विकल्पाने' प्रचलित आहे.' (- शास्त्रीय मराठी व्याकरण - मो. के. दामले - अर्जुनवाडकर संपादित मुद्रावृत्ती-१९७०, पृ. ३४०) माझ्या मूळ परीक्षणलेखातही हाच संदर्भ दिलेला आहे.

□□□

**मु. व पोस्ट चौल, ता. अलिबाग, जि. रायगड -४०२ २०३.**

# मराठी अभ्यास परिषद

## चौथ्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्त

नीलिमा गुंडी

मराठी अभ्यास परिषदेची चौथी वार्षिक सर्वसाधारण सभा महाराष्ट्र-साहित्य-परिषद, पुणे येथे दि. २७/८/२००० रोजी दु. ५.०० वाजता आयोजित केली होती. सभेचे कामाकाज डॉ. अशोक केळकर यांच्या अध्यक्षतेखाली सुरू झाले. सुरुवातीला कार्यवाह डॉ. मृणालिनी शहा यांनी मांडलेल्या परिषदेशी संबंधित तसेच भाषाविषयक लेखन करणाऱ्या दिवंगत साहित्यिकांना एका ठरावाद्वारे सभेने श्रद्धांजली वाहिली. पु.ल.देशपांडे, द. न. गोखले, नरेश कवडी, दिनेश माहुलकर, अच्युतराव आपटे, कुमुद पोरे आणि शांताराम पारपिल्लेवार या साहित्यिकांना सभेने एक मिनिट स्तब्ध उभे राहून श्रद्धांजली वाहिली.

त्यानंतर कार्यवाहांनी गेल्या वार्षिक सर्वसाधारण सभेचे इतिवृत्तवाचन केले. डॉ.लद्दू आणि डॉ. धडफळे यांनी त्यासाठी अनुक्रमे सूचक व अनुमोदक म्हणून मान्यता दिल्यावर सभेने ते इतिवृत्त मंजूर केले. परिषदेच्या गतवर्षातील कार्यक्रमांचा सविस्तर अहवालही कार्यवाहांनी सभेपुढे सादर केला. त्यात 'अंतर्नाद' मासिकात संस्थेच्या वतीने चालवल्या जाणाऱ्या 'संसार-भाषेचा' या सदराचा, नव्या उपक्रमांमध्ये समावेश होता. खजिनदार डॉ. पुंडे यांनी गतवर्षाचा आर्थिक अहवाल सादर केल्यानंतर २०००-२००१ या वर्षासाठीचा अर्थसंकल्प सभेपुढे चर्चेसाठी ठेवला. प्रा. प्र. ना. परांजपे यांनी बँकेच्या जमाखात्यात साठलेली बरीच रक्कम खर्च करण्यासाठी परिषदेपुढे काही योजना आहेत का? - अशी विचारणा केली. 'भाषा आणि जीवन' या संस्थेतर्फे चालवल्या जाणाऱ्या त्रैमासिकाची पृष्ठसंख्या वाढवण्यात यावी, अशी सूचनाही त्यांनी केली. परंतु लेखकांची कमतरता असल्यामुळे ही सूचना स्वीकारण्यास संपादक डॉ. देव यांनी असमर्थता दर्शवली. डॉ. आशा मुंडले यांनी मराठी दिन अथवा संस्थेचा वर्धापनदिन साजरा करण्याबाबतची सूचना केली. तेव्हा डॉ. पुंडे यांनी संस्था संयुक्त उपक्रमांमध्ये सहभागी होण्यास तयार असल्याचे मत व्यक्त केले. तर डॉ. केळकरांनी पुरेशा मनुष्यबळाच्या अभावी संस्थेला कार्यक्रमांच्या संयोजनात येणाऱ्या अडचणींची सभेला कल्पना दिली व तरुणांचा संस्थेतील सहभाग वाढावा, अशी इच्छा व्यक्त केली. प्रा. राईलकरांनी बँकेच्या जमाखात्यातील





अनुक्रमणिका

रक्कम, ठेव म्हणून किमान १५ अथवा ३० दिवसांसाठी गुंतविल्यास व्याजाचे नुकसान होणार नाही, अशी सूचना केली तेव्हा डॉ. केळकरांनी त्याबाबत येणाऱ्या व्यावहारिक अडचणी सभेपुढे मांडल्या. या चर्चेनंतर डॉ. विठ्ठल सोनवणे यांनी सूचक व डॉ. श्रीरंग संगोराम यांनी अनुमोदक म्हणून मान्यता दिल्यावर सभेने अर्थसंकल्प एकमताने मंजूर केला. पुढे आयत्यावेळच्या विषयांमध्ये काही बाबी चर्चेसाठी आल्या. त्यात प्रा. परांजपे यांनी सर्वसाधारण सभेने पुढील वर्षासाठी कार्यक्रम सुचवावेत, असे सांगितले. परंतु अध्यक्षांनी सूचना लेखी स्वरूपात याव्यात, हा आग्रह कायम ठेवला. डॉ. कल्याण काळे यांनी लेखकांची कमतरता असताना संस्थेने आपले लेखक 'अंतर्नाद' कडे का वळवले; अशी विचारणा केली. तेव्हा 'अंतर्नाद' मधील सदरामुळे परिषदेला नवा वाचकवर्ग मिळवण्यास मदत होत असल्याचे प्रतिपादन अध्यक्षांकडून करण्यात आले. डॉ. धडफळे यांनी संस्थेच्या कामकाजाविषी समाधान व्यक्त केले आणि तांत्रिक बाबींवर भर येऊन कामात अडथळा येऊ नये, असे आवाहन केले. शेवटी कार्यवाहांनी आभारप्रदर्शन केल्यानंतर अध्यक्षांनी सभेचा औपचारिक समारोप केला. त्यानंतरही अनेक आजीव सदस्यांच्या उपस्थितीमुळे सभास्थानी अनौपचारिक स्नेहसंमेलनाचे वातावरण सर्वांना काही काळ अनुभवता आले.

□□□

३, अन्नपूर्णा, १२५९ शुक्रवार पेठ, सुभाषनगर, पुणे- २.

---

## प्रश्नाचं उत्तर असावं तर असं

पार्लमेंटमध्ये प्रश्नोत्तरे चालत तेव्हा पंतप्रधान ॲटली ज्या प्रकारे उत्तरे देत त्यावर विन्स्टन चर्चिल यांची टिप्पणी:

'एकदा काय झालं, युद्धकाळात मी एका मित्राला भेटायला गेलो. कडक दिवाबंदीमुळे मिट्ट काळोख, त्यामुळे माझा गाडीचालक वाट चुकला. एका पादचाऱ्याला त्याने चुटक्या वाजवून जरा धसमुसळेपणानेच बोलावून घेतलं. तो माणूस गाडीजवळ आल्यावर मी म्हणालो, 'आम्ही वाट चुकलो आहोत. कुठे आहोत आम्ही?' 'तुमच्या गाडीत, महाशय', असे तो वैतागलेला गृहस्थ म्हणाला आणि चालू लागला. श्रीयुत ॲटलींची उत्तरं अगदी अशीच असतात, शब्द मोजके, मुद्द्याला धरून, पण प्रश्नकर्त्याला अंधारातच ठेवणारी!''

□□□

## : आवाहन :

'समाज प्रबोधन पत्रिका' हे मराठीतील एक नावाजलेले वैचारिक नियतकालिक आहे. सध्या ते त्रैमासिक स्वरूपात प्रसिद्ध होते. या नियतकालिकात सामाजिक कार्यकर्ते, विद्यार्थी, प्राध्यापक तसेच इतर मराठी वाचकांना समकालीन प्रश्नांवरील अभ्यासपूर्ण लेख वाचायला मिळतात. तरी राजकारण, अर्थकारण, समाजकारण व संस्कृती यांत रस असलेल्या वाचकांनी / ग्रंथालयांनी वर्गणीदार होऊन ''पत्रिके''च्या वाचक वर्गाचा विस्तार करावा अशी विनंती आहे.

**पत्रव्यवहाराचा पत्ता :-** समाजप्रबोधन पत्रिका, द्वारा प्रा. राजेंद्र व्होरा
राज्यशास्त्र विभाग, पुणे विद्यापीठ
पुणे - ४११ ००७.

**वर्गणीचे दर :-** व्यक्ती : वार्षिक रु ६० /-
एक वर्षाहून अधिक मुदतीसाठी
प्रतिवर्षी रू ५०/-
संस्था : वार्षिक रू १००/-
पूर्ण वेळ कार्यकर्त्यासाठी : तीन वर्षाची वर्गणी रू १००/-
(धनादेश : समाजप्रबोधन पत्रिका या नावाने काढावेत. वटणावळ रु. १२/-)

**संपादक :-** राजेंद्र व्होरा, सुहास पळशीकर, भास्कर भोळे, किशोर बेडकिहाळ, शांताराम पंदेरे.

१. **'मराठी अभ्यास परिषद पत्रिका : भाषा आणि जीवन'ची वर्गणी :**

वर्गणी भरण्यासाठी पत्रिकेचे वर्ष जानेवारी ते डिसेंबर असे आहे. या त्रैमासिकाचे वर्षात चार अंक निघतात. वर्गणीची आकारणी पुढीलप्रमाणे:

**वार्षिक वर्गणी -**

संस्थेला १०० रु.
व्यक्तीला ७५ रु.
परदेशातील व्यक्ती / संस्था २० डॉलर

२. **पैसे भरण्याबद्दल सूचना :**

वर्गणी रोखीने किंवा धनादेश /मनिऑर्डर ने देता येईल. धनादेश 'मराठी अभ्यास परिषद' या नावाने काढावा. धनादेशासोबत/ मनिऑर्डर कूपनवर आपले नाव, पत्ता, रक्कम, कोणत्या वर्षासाठी हे अवश्य लिहावे. नमुना अंक मिळाला असल्यास कोणता याचा उल्लेख करावा. धनादेश पुण्याबाहेरच्या शाखेचा असल्यास रकमेत ५ रुपये वटणावळ अधिक घालावी. पावती दिली जाईल. वर्गणी व तत्संबधी पत्रव्यवहाराचा पत्ता : मृणालिनी शहा, कार्यवाह, १ शीतल अपार्टमेंट्स, ४६/४ एरंडवणे, पुणे- ४११००४

३. **मागील अंक :**

'भाषा आणि जीवन' हे त्रैमासिक १९८३ पासून प्रसिद्ध होत आहे. (१९८३ या वर्षी मात्र दोनच अंक निघाले आहेत.) एखाद दुसऱ्या अंकाचा अपवाद वगळता सर्व वर्षांचे अंक उपलब्ध आहेत. १९८३ ते १९९० पर्यंतच्या प्रत्येक अंकाची किंमत रु. १०/-, १९९१ पासून पुढील वर्षातील प्रत्येक सुट्या अंकाची किंमत रु २०/-

४. **प्रकाशने :**

या त्रैमासिकातील निवडक लेखांचे संपादित पुस्तक 'निवडक भाषा आणि जीवन' (किंमत रु.२००) परिषदेच्या कार्यवाहांकडे अथवा मेहता पब्लिशिंग हाऊसमध्ये मिळू शकेल. तसेच 'भाषांतर मीमांसा' हे पुस्तकही कार्यवाहांकडे अथवा प्रतिमा प्रकाशनकडे उपलब्ध आहे.

५. **जाहिरातीसाठी दर :**

पूर्णपान ७५० रु., अर्धेपान ४०० रु., पाव पान २५०रु, शुभेच्छा सूचना १०० रु., आवरण पृष्ठ तीन/चार ८०० रु. जाहिरात मराठीत असल्यास उत्तम, हिंदीत, इंग्रजीत असल्यास चालेल.

नोंदणी क्रमांक : ०-४००४८/८३

# मराठी वाचा मराठी वाचवा

मराठी भाषेबद्दल
अशा प्रकारची
सुटसुटीत आणि चटकदार
संदेशवाक्ये हवी आहेत.

संपर्क :
**मराठी अभ्यास परिषद**
१ शीतल अपार्टमेंट, ४६/४, एरंडवणे,
पुणे ४११००४. (दूरध्वनी ५४३३८६९)